वत्सला साहित्य प्रकाशन : पुष्प २ रें

# अधःपात आणि इतर गोष्टी

[ दारूचे दुष्परिणाम व दारूबंदीची आवश्यकता विशद करणाऱ्या मनोवेधक लघुकथांचा संग्रह ]

: संग्राहक :

जयवन्त बाबुराव जगताप,
बी. ए. ( ऑनर्स )

: प्रस्तावना लेखक :

नामदार अण्णासाहेब लठ्ठे,
( अर्थसचिव )

प्रथमावृत्ति ] किंमत १ रुपाया [ १ ऑगष्ट १९३९

# दोन शब्द



मुंबई सरकार लौकरच दारूबंदी करणार आहे असें जाहीर होतांच त्यांच्या या पवित्र आणि उदात्त कामगिरीस वाङ्मयाचें रूपानें आपणहि थोडाफार हातभार लावावा या एका हेतूनें प्रेरित होऊन मी दारूबंदीवरील लघुकथासंग्रहाला सुरवात केली.

या माझ्या अंगिकृत कार्यास बृहन्महाराष्ट्रांतील लेखकवर्गानें आपुलकीच्या भावनेनें आपल्या कथा पाठवून मला उपकृत करून ठेविलें आहे.

सदरील संग्रहास **नामदार अण्णासाहेब लठ्ठे** यांची प्रस्तावना लाभली, हें मी माझें महत्भाग्य समजतो. नामदारसाहेबांच्या पाठीमागें कामांची गर्दी असतांहि वेळांत वेळ काढून त्यांनीं माझे विनंतीला मान दिला याबद्दल मी त्यांचा सदैव ऋणी राहील.

पुस्तकाची सजावट माझे परमस्नेही श्री. वामनराव पानगंटी यांनीं केल्याबद्दल मी त्यांचा आभारी आहे.

प्रकाशनाच्या कामीं मला वेळोवेळीं मदत करणाऱ्या अनेकांचीं नांवें मला जरी येथें नमूद करतां आलीं नाहींत तरी त्यांच्या उपकारांची स्मृति माझ्या हृदयांत कायमची राहील.

१७ ऑगष्ट १९३९ ] — **जयवन्त जगताप.**

# अर्पणपत्रिका

कैलासवासी

माधवराव हरि चिपळूणकर

यांच्या पुण्यस्मृतीस

हा कथासंग्रह

मी नम्रतेनें अर्पण करीत आहे.

— संग्राहक

# प्रस्तावना



श्रीयुत जयवंतराव जगताप बी. ए. यांनीं संग्रहित केलेल्या गोष्टींचें हें पुस्तक मद्यपानाचे दुष्परिणाम दाखविण्याकरितां योग्य वेळीं प्रसिद्ध होत आहे. ज्या ठिकाणीं दारूबंदी झालेली आहे तेथील पूर्वी दारू-बाज असून आतां ज्यांना दारू मिळत नाहीं त्यांची करमणूक करण्यास आणि कोणत्या हीन स्थितींतून त्यांचा दारूबंदीमुळें उद्धार होत आहे हें त्यांच्या मनावर ठसविण्यास या गोष्टी उपयोगी पडतील. इतर ठिकाणीं कॉंग्रेस पक्षाच्या योजनेप्रमाणें लवकरच सुरूं होणाऱ्या दारूबंदीस लोकमत अनुकूल करून घेण्यासहि त्यांचा चांगला उपयोग होईल.

निरनिराळ्या लेखकांच्या या गोष्टी आहेत. अर्थातच त्यांच्या विशेष गुणाचें वर्णन एकाच पद्धतीनें करणें योग्य नाहीं. तरी या सर्व गोष्टी मनाला चटका लावणाऱ्या, नेहमींच्या अनुभवांतल्या, फारशी अतिशयोक्ति न करितां सांगितलेल्या आहेत, असें सर्वच गोष्टींविषयीं म्हणतां येईल.

निवड करण्यांत रा. जगताप यांनीं पुष्कळ कौशल्य दाखविलें आहे. दारूबंदीच्या मोहिमेस त्यांचा प्रयत्न चांगली मदत देऊं शकेल, म्हणून त्यांच्या प्रयत्नांचें अभिनंदन करणें जरूर आहे. विशेषतः दारूच्या व्यसनानें ज्या वर्गाची हानी झालेली आहे त्यांच्या परि-

स्थितीची रा. जगताप यांना चांगली जाणीव आहे. त्या वर्गाची सुख-दुःखें सहानुभूतीनें ओळखण्याची पात्रता त्यांच्या ठिकाणीं आहे. यामुळेंच त्यांनीं हा कथासंग्रह मराठी वाचकांना सादर केला असला पाहिजे. दारूच्या व्यसनाला बळी पडत असलेल्या सर्वांच्या हातीं हें पुस्तक जाईल व त्या व्यसनाच्या घातुक प्रवृत्तीबद्दल सर्व वाचकांची खात्री होईल, अशी मला उमेद आहे.

**पुणें.**
**ता. १५।८।३९**

**आ. बा. लट्टे.**

## आमचें प्रकाशन—

| | | | |
|---|---|---|---|
| १ | प्रसाद | किंमत ( ट. ख. सह ) | १२ आणे |
| २ | मराठमोळा | ,, | १२ आणे |
| ३ | मुंबई ते कलकत्ता | ,, | ६ आणे |
| ४ | गुंतागुंत | ,, | ८ आणे |
| ५ | अधःपात आणि इतर गोष्टी | ,, | १ रुपाया |
| ६ | प्रौढांचें शिक्षण–साक्षरता प्रसार | ,, | ८ आणे |
| ७ | माझी शाळा | ,, | ६ आणे |
| ८ | अध्यापनाचा परिचय | ,, | १० आणे |
| ९ | शाळा कशी चालवावी | ,, | ८ आणे |
| १० | टॉलस्टॉयच्या आठ गोष्टी | ,, | ८ आणे |

— **पुढील प्रकाशन**

?

**सौ. आनंदीबाई शिर्के यांचा कथासंग्रह**

*   *   *

History of English Literature
( for B. A. English Students )
By: **J. B. Jagtap. B. A.** ( Hons. )

# कथाक्रम







# १

## अधःपात

ती नुकतीच कामावरून दमून भागून आली होती. थकवा घालविण्यासाठीं तिनें जरा भुइवर अंग टाकलें. आणि मनाला विरंगुळा म्हणून मुलीला जवळ घेतलें. भांडीं घांसून घांसून रांकट झालेले आपले हात मुलीच्या अंगातोंडावरून फिरवीत ती स्वतःचा श्रमपरिहार करीत होती. इतक्यांत कर्रर्रर, कर्रर असा कोंकणी वहाणांचा आवाज तिच्या कानीं आला. ती चटकन् उठली. भ्यालेल्या हरिणीप्रमाणें तिनें आपलें पाडस पोटाशीं धरलें आणि लगबगीनें शेजारणीची खोली गांठली. आपली ठेव तिच्या हातीं निरवून, गेली तशीच झटकन् ती स्वतःच्या खोलींत परत आली. इकडचें गाडगें तिकडे आणि तिकडचें काटुक इकडे करीत ती काम करीत असल्याचा बहाणा करीत होती. पण तिचें सारें लक्ष त्या करकरणाऱ्या वहाणांच्या आवाजाकडे होतें. मनांत ती भीतीनें कांपत होती. इत-

क्यांत वहाणांची करकर थांबली. घोंडीबा-तिचा नवरा-घरांत आला

प्रत्यक्ष पोरीचा जन्मदाता घरीं येत आहे, हें ओळखून मुलीला एकाद्या हिंस्र श्वापदाच्या तावडींतून वांचविण्याकरितां लपवावी तशी तिनें शेजारणीच्या निवाऱ्याला नेऊन ठेविली. हें जरा चमत्कारिक तर खरेंच पण त्याला कारण घोंडीचें अपत्यवात्सल्यच तशातऱ्हेचें होतें. तो कांहीं कोणी सुधारक किंवा संततिनियमनाचा पुरस्कर्ता नव्हता. ती कांहींएक भानगड नव्हती. त्याला फक्त मुलें आवडत नव्हतीं. कारण तीं कांहीं उपयोगाचीं नसतां बायको त्यांवर वात्सल्याचा वर्षाव करते, हें एक, आणि तीं घरांतील अन्नांत वांटेकरी होतात हे दुसरें, आणि मुख्य म्हणजे वांटे करायला घरांत तसें फारसें अन्नहि नसेंच.

घोंडी बेकार होता. तसा तो शिकलेला नव्हता कीं, कलावंत नव्हता. त्याचें औद्योगिक क्षेत्र म्हणजे शेत, गवंडीकाम, गिरणी इत्यादि. तो मजुरी करूं जाणत होता. पण ती मिळवूं जाणत नव्हता; नी टिकवूं तर त्याहून जाणत नव्हता. त्यामुळें वर्षांतून थोडेच महिने तो कामावर असे, बाकीच्या काळांत बेकारच असे. असें जरी होतें तरी पोट थोडेंच बेकार रहातें? त्याला इंधन हें घातलेंच पाहिजे. नाहींतर सावित्रीचा सौभाग्य सूर्य × × × आणि म्हणून हें काम, ही आवश्यक गरज ती स्वतःचे काबाडकष्ट करून भागविण्याचा प्रयत्न करी. परंतु एवढ्यानेंच त्याचें भागत नव्हतें.

त्याच्या गरजा आणखी वाढल्या होत्या. विडीकाडी, चहा आणि दारू. आणि जितकें रिकामपण अधिक तितकी या साधनांची गरजहि अधिकच. केवळ भांडीं घांसण्याच्या कमाईवर हें सारें कसें चालावें? एक नाहीं, दोन नाहीं, चार पोटांचा प्रश्न. जेमतेम जगण्याइतपत ओली कोरडी भाकरी चार पोटांना घालायची म्हटलें तरी निदान आठदहा रुपये महिन्याला सहज पाहिजेत. त्याशिवाय घरभाडें कपडालत्ता वगैरे. भांडीं घासून आठदहा रुपये मिळवायला सावित्रीला कमींत कमी पांच सहा घरीं तरी दिवसांतून दोन दोन हेलपाटे घालावे लागत. शिवाय हीं घरें ओळीनें एकाच आळींत असणें अर्थातच शक्य नव्हतें. याकामीं जाण्यायेण्यांतहि तिचा बराच वेळ जाई. तितकी तिची गैरहजेरी बेकार धोंडीला जाणवे.

आपली नाकीं डोळीं नीटस शेलाटी बायको घरोघरीं कामाला जाते. कोणाची नजर कशी? कोणाची कशी! आणि आपलें हें दारिद्र्य असे! सदाच बेकार! एखादेवेळीं तिचीहि मति फिरली तर? या विचारानें तो मनांतल्या मनांत कुढे—चडफडे. तो चांगला शुद्धींत असला आणि एकटाच शान्तपणें विचार करीत बसला म्हणजे त्याला वाटे, जगांतील कोणत्याहि पुरुषापेक्षां आपण किती कुरूप नालायक आहोंत? नेहमीं बेकार. मिळवत्या सावित्रीला नवरा म्हणून तर मुळींच शोभत नाहीं पण हे विचार तो मनांतल्या मनांत अगदीं आंतल्या कप्प्यांतच ठेवी. स्वतःशींसुद्धां तो ते उच्चा-

रीत नसे. मुख्य म्हणजे ह्या विचाराचा पगडा त्याला क्षण दोन क्षण सुद्धां मानवत नसे. तो सावित्रीला नेहमीं म्हणे—

“ लोकांचीं असलीं कामं कशाला करतेस? आमच्या घराण्यांत असलीं कामं कोणीं केलीं नाहींत. खायला नाहीं मिळालं तर काय मरशील? ”

सावित्री म्हणे—“ मी मरणच मागतें देवाजवळ. पण उघड्या डोळ्यांनीं जीव जात नाहींना! काय करूं खानदानी घराण्याचा बडिवार सांगून पोरांची पोटं भरलीं असतीं तर मी तरी कशाला गेलें असतें लोकांचीं खरकटीं घांसायला? माझ्याच माहेरांत कोणी हीं कामं केलीं नाहींत. ”

हा टोमणा धोंडीला फार लागे. मी बेकार म्हणून माझा सारखा पाणउतारा करते. भांडीं घांसून कुठं चार रुपड्या कमवून आणते त्याचा एवढा दिमाख हं! तिचा हा मिजास उतरलाच पाहिजे. यावर रागाची बोलाचाली होई. प्रकरण हातघाईवर येई. आणि बायको म्हणजे पायांतली वहाण, ती पायांतच असली पाहिजे, हें तत्व पटवून देण्याकरितां पायांतल्या करकरणाऱ्या कोंकणी वहाणेनेंच तो तिला फोडून काढी. कष्ट करणें, अर्धपोटीं रहाणें; एक वर्षाआड मुलास जन्म देणें व त्याचा मृत्यु पहाणें, आणि वर मार खाणें, हा सावित्रीचा जीवितक्रम झाल्यासारखा होता. यांत क्वचित् कधीं बदल होई. तिचा मोठा मुलगा बारा वर्षांचा असून जरा तिखट

होता. बापाची बेजबाबदार वर्तणूक व आईचे हाल पाहून तो कधीं कधीं आईच्यावतीनें बापाशीं सामना करी. आणि मग बालवीराचे जे कांहीं हाल होत ते सावित्रीला पहावत ना. तिनें त्याला भावाकडे पाठविलें होतें. कुठेंहि बाळ वाढला तर काळ फेडील ही मनींची आशा. जिवाला विरंगुळा म्हणून धाकटी मुलगी तेवढी तिनें जवळ ठेविली होती. लोकांकडून मिळालेलें अन्न ती मुलीला घाली. आणि नवऱ्याच्या माराच्या तडाक्यांतून वांचविण्याकरितां—तो येण्याच्या वेळीं शेजारणीकडे ठेवी. आतांहि तिनें तसेंच केलें. त्या सहा वर्षांच्या निष्पाप मुलीचें नांव होतें ठकी. नाहीं तरी मुलाचें अन्वर्थक नांव ठेवण्याच्या बाबतींत आपला महाराष्ट्र अत्यंत मागासलेला आहे. एखाद्या झुरळाला भिणाऱ्या काडीपैलवानाचें नांव असायचें शिवाजी किंवा प्रताप! आणि एखाद्या कोळशांतील माणिकाचें नांव असावयाचें रत्नप्रभा! नाहीं तर पिचपिच्या डोळ्याची सुलोचना असायची! क्वचित् कोठें चुकीनेंच सार्थ नांव ठेवलें जातें. पण धोंडबांच्या बाबतींत त्याच्या पितरांनीं नांव ठेवण्यांत मोठें औचित्य दाखविलें होतें. तो अंतर्बाह्य नामसादृश्य होता.

त्याच्या तोंडाकडे नजर टाकतांच सावित्रीनें जाणलें कीं 'स्वारी घोड्यावर आहे.' तिनें मुकाट्यानें चुलींत काटुक सारलें व पिठाची पितळी पुढें घेतली. तिची ती तयारी पाहून धोंडीनें गर्जना केली.

"कुठंय कार्टी? [ खरकट्या शितांकडे बोट दाखवून ] कार्टीनं

तेवढा भात खायचा आन् आम्हीं भाकर खायची ? "

"तीं देसाईबाईनं दिलीं होतीं चार शितं."

पीठ मळतां मळतां ती म्हणाली.

"तुला आयाबाया भात देतात काय? अस्सं—अन् तो तूं न तुझी मुलगी खातां, नाहीं काय ? "

"मला कोणी कांहीं फुकट देत नाहीं. भांड्यांत उरलेला असतो तो काय त्या काढून घेतील ? "

असें उत्तर द्यावेसें तिला वाटलें. पण एक तर तें ऐकण्याच्या स्थितींत नवरा नव्हता. आणि तिच्या मालकिणी खरोखरच तिच्या मुलीकरितां मुद्दाम कांहींना कांहीं अन्न उरवीत असत. थोडें थोडें करतां तिच्या मुलीचें पोट भरण्याइतकें तें सहज असे. उगाच वाद वाढूं नये म्हणून नेहमींप्रमाणें ती स्तब्धच राहिली. पण तिचा तो थंडपणा पाहून धोंडीचें डोकें मात्र जास्तच तापलें. तो ओरडून म्हणाला—

"ऐकायला येतंय काय? भाकर नको मला 'च्या' पायिजे."

"दूद साकर च्या काइबी नाइ घरांत, मग च्या कसली करूं ? "

धोंडीचा मिजास पुरताच गेला. त्यानें चुलीजवळचें लांकूड घेऊन जोरानें तिच्या डोक्यावर हाणलें. गांठीचें लांकूड असल्यामुळें तडाखा बसतांच ती धाडकन् खालीं पडली. पितळीच्या पातळ धारदार कांठावर तिच्या कानशिलाचा भाग जोरानें आदळला गेल्यामुळें

दुसऱ्या बाजूलाहि मोठी जखम झाली, पिठांत तिचें रक्त सांडलें. दुःखानें व भयानें ती ओरडत दाराकडे पळत गेली, पण घेरी येऊन तेथेंच धाडकन् पडली व बेशुद्ध झाली.

*     *     *

नंतर काय काय प्रकार झाले ते तिला कळलें नाहींत. पण तिनें भीत भीत जेव्हां डोळे उघडले तेव्हां ती सरकारी दवाखान्यांत खाटेवर होती. आणि तिच्या एका बाजूला एक पोलीस व दुसऱ्या बाजूला एक परिचारिका उभी होती. त्यांचा तो एकमेकांच्या विरुद्ध रंगाचा पेहराव पाहून तिला कसेंसेंच वाटलें. एकंदर प्रकार आठवण्याकरितां तिनें डोक्याला हात लावला. तों तें भयंकर दुखलें. त्यावर पट्या बांधलेल्या होत्या. तिनें दुःखोद्गार काढला. पण तिकडे दुर्लक्ष करून पोलीस तिची जबानी घेऊं लागला. त्यानें तिचें रक्तानें भरलेलें लुगडें, चोळी, तिला दाखवून जप्त करून नेलें.

त्याच संध्याकाळीं तिच्या नवऱ्याचा एक मित्र व त्याची दूरची मावशी तिला भेटायला आली. अशाहि स्थितींत सावित्री आपल्या नवऱ्याची चिन्ता करीतच होती. भेटीला आलेल्या त्या दुकलीच्या सांगण्यावरून ती जास्तच वाढली. त्यांनीं तिला हलक्या आवाजांत सांगितलें कीं—

“ धोंडीला पोलीसांनीं धरून नेलाय. पितळी अन त्यें लांकूड पर नेलं. जामीन मिळाला तर तो सुटल, पर त्याच्यावर काम चालल.

अन् त्याला शिक्षा बी व्हइल म्हनतात. बग बया साइत्रे ? पूर्वी रामराज्यामंदी यक साइत्री होऊन गेली. तिनं यमाच्या दाडंतून सत्तीवानाला वडून आनला. तूं तुझ्या नवऱ्याला काळाच्या दाडखालीं लोटू नग. त्याला तुरुंगात घालनं, सोडीवनं तुझ्या हातांत हाये बग."

हें ऐकून सावित्रीला फार दुःख झालें. ती निश्चयपूर्वक म्हणाली—

"हें का मला सांगाया होवं ? माज ते धनीच हाइत"

जवळ जवळ दोन आठवडे सावित्री दवाखान्यांत पडून होती.

* * *

योग्य वेळीं कोर्टांत खटला सुरू झाला. धोंडी जामिनावर खुला होता. फिर्यादी पोलीस होते. पुरावा बळकट होता. त्यांच्या विरुद्ध झगडण्यासाठीं वकील देणें जरूर होतें. वकिलास फी देण्यास कांहींच नसल्यामुळें सावित्रीनें स्वतः कमाई करून घडविलेले चांदीचे गोठ त्यानें नवरेपणाच्या हक्कानें तिच्या हातांतून काढून घेऊन गहाण टाकले. अशा रीतीनें वकिलाची तरतूद झाली. त्याचे बाटलीमित्र बाटलीच्या साह्यानेंच पढविले गेले. एकंदर प्रकरण असें मांडण्याचें ठरलें कीं,

"तिला मारण्याचा उद्देश्य नव्हता. नुसती सहज चापट मारिली तर ती पितळीवर पडली, जखम झाली. पुन्हां उठली ती दुसऱ्या बाजूवर पडली, लाकूड लागलें, घेरी आली. हें तिच्या अशक्तपणामुळें घडलें." इ.

याला दुजोरा देण्याचें सावित्रीनें कबूल केलें. तिच्या नवऱ्यानें तिला निक्षून सांगितलें कीं,

"आम्ही जरी गरीब असलों अडाणी असलों तरी आम्हास अब्रू आहे. आमच्या वाडवडिलांपैकीं कोणीं कधी कोर्टाची पायरी चढले नव्हते तर तुरुंगांत कोठून जाणार? आतां तुझ्यापायीं हें माझ्या कपाळीं येणार."

बिचारी सावित्री! तिनें हें टाळण्याकरितां "जसें सांगाल तसें बोलेन" अशी प्रतिज्ञा केली.

पंचनाम्याच्या वेळीं जी शेजारीण तेथें उभी होती तिची साक्ष पोलिसानें काढली होती. तिनें खोटी साक्ष द्यावी याकरितां सावित्रीनें अतिशय विनवण्या करून तिचें मन वळविलें होतें. परंतु त्या बिचारीनें यापूर्वी कोर्ट कधींच पाहिलेलें नसल्यामुळें तें तेथील एकंदर भांबावून टाकणारें गंभीर वातावरण पाहून तिला शपथेवर खोटें बोलवेना. तिची साक्ष पोलिसच्या बाजूची झाली,

आतां सावित्रीची साक्ष होती. आपला नवरा निर्दोषी आहे हे तिनें जीव तोडून सांगितलें. ती म्हणाली,

'सरकार, पावसानं भिजविलं आणि धन्यानं मारलं तर त्येचं काय? आदी माझाच तोल गेला. एकदां मी अशी पडलें, तर पितळीची धार कानशिलाला लागली. पुन्हां उठलें तर माझा पुन्हां तोल गेला. त्यांचा कांहीं गुन्हा नाहीं."

सावित्रीच्या अंगांत कै. गडकऱ्यांच्या सिंधूचा संचार झाला होता जसा कांहीं. तिची जबानी चालू असतां कोर्टाला सारखी सिंधूची आठवण होऊन हंसूं येत होतें. त्या दगडाला वांचविण्या-करितां ह्या साध्याभोळ्या जिवाची जी धडपड चालली होती, ती पाहून लोकांना तिच्याबद्दल कौतुक व सहानुभूति वाटूं लागली.

नवऱ्यावरील आरोपांचें निर्मूलन करण्याकरितां गडकऱ्यांच्या सिंधूनें, तें सर्व जेव्हां आपल्या स्वतःच्या अशक्तपणावर ओढून घेतलें, तेव्हां फौजदारानें तिच्या भावास जें उत्तर दिलें, त्याचीच आतां पुनरावृत्ति होतें कीं, काय असेंच क्षणभर लोकांना वाटलें. परन्तु कोर्टाचा वेळ झाल्यामुळें तसें कांहींएक न होतां कोर्ट उठलें.

*　　*　　*

बायकोच्या अनुकूल जबानीमुळें खुशींत गाजरे खात असलेल्या घोंडीला त्याच्या वकिलानें जेव्हां वस्तुस्थितीची जाणीव करून दिली तेव्हां त्याचें धाबें दणाणलें. त्याला वाटलें, या साऱ्या अन-र्थाचें मूळ जी आपली बायको, तिला चांगली झोडपून काढावी. आणि पुन्हां बजावून सांगावें कीं ' मी गरीब, बेकार असलों तरी मला अब्रू आहे. माझ्या घराण्यांत कोणी तुरुंगांत गेलेलें नाहीं. '

पण एकदां झोडपलें तेंच निस्तरतांना पुरेवाट होत होती. तेव्हां हा बेत तूर्त पुढील वेळेकरितां राखून ठेवणें त्याला भाग पडलें. त्यानें आपल्या मित्रमंडळींची तांतडीची बैठक भरविली. यांत

त्याच्या घराण्याचा अभिमान बाळगणारे त्यांचे कांहीं बुभुक्षीत भाऊबंदहि होते. त्यांच्या भाऊबंदकीची ओळख पटायला अशाच पर्वणीची आवश्यकता असते. बैठकींत एकमतानें ठरलें कीं " यःकश्चित बायकोसाठीं घराण्याची अब्रू खराब होऊं देणें हें कांहीं चांगलें नाहीं. धोंडीची अब्रू ती आमचीच अब्रू ! "

घराण्याचा अभिमान बाळगणाऱ्या एका अधिक अनुभवी भाऊबंदानें सर्वांना सांगितलें कीं, " नुसतें मारणेंच काय ? रागाच्या भरांत बायकोचा खून करून निर्दोष सुटल्याचीं उदाहरणें मला माहीत आहेत. मात्र राग येण्याचें कारण तसेंच सबळ पाहिजे. "

झालें. एवढी कायद्याची माहिती अन् भाऊबंदाच्या एकोप्याचा आधार असल्यावर आणखी काय पाहिजे ? कोणी काय बोलायचें तें अगदीं व्यवस्थित ठरलें.

* * *

ठरलेल्या दिवशीं नवराबायको अनुक्रमें आरोपी साक्षीदारांच्या पिंजऱ्यांत उभीं होतीं. तत्पूर्वीं इतर साक्षीपुरावे होऊन गेले होते. ते बिनतोड होते. निकाल ठरल्यासारखाच होता. सावित्रीविषयीं सहानुभूति व धोंडीविषयीं तिटकारा खटला ऐकणाऱ्यांच्या मनांत भरून राहिलीं होतीं.

रीतिप्रमाणें न्यायमूर्तींनीं आरोपीस विचारलें, " सर्व साक्षीपुरावा झाला, तो तूं ऐकलास, आतां यावर तुझें काय म्हणणें आहे ?

गुन्हां कबूल आहे ?"

आरोपी खांकरला. त्यानें एकदां सावित्रीकडे पाहिलें. नंतर लगेच आपल्या भाऊबंद व मित्रमंडळींच्या प्रभावळीकडे पाहिलें. आणि घोगऱ्या आवाजानें तो बोलूं लागला.

" सरकार— "

रक्तपातानें व चिंतेनें अशक्त झालेली सावित्री कठड्याला टेकून उभी होती, ती मनांतल्या मनांत म्हणत होती—" देवा न्याय-मूर्तींच्या मनींमुखीं उभा रहा, अन् माझ्या नवऱ्याला वांचीव."

" सरकार, मी बायकोला मारलं, हें खरं; पण मारायला तसंच कारण झालं !"

प्रश्नार्थक मुद्रेनें न्यायमूर्तींनीं त्याच्याकडे पाहिलें. भिरभिरणारें डोकें गच्च धरून सावित्री लक्षपूर्वक ऐकत होती.

" काय कारण झालं ?"

" माझी बायको, माझ्या बायकोची वाईट चाल माझ्या नजरेस आली. तेव्हां रागाच्या भरांत—"

ठरलेलीं वाक्यें भरकन् घोंडी बोलून गेला. परंतु " काऽऽय ?" एवढा एकच आर्त उद्गार काढून घायाळ पक्षिणीप्रमाणे ती धाडकन् खालीं कोसळली.

—सौ. आनंदीबाई शिर्के.

( जळगांव )

# २

## दारूबंदी की जय !

"आई आई दारूबंदी म्हणजे काय माहिताय तुला ?" छोट्या भगवाननें आईच्या गळ्याला मिठी मारून तिला विचारलें. शाळा सुटल्यावर तो धांवतच आपल्या घरीं आला होता. दररोज तो शाळेंतल्या नव्या नव्या गमती आपल्या आईला सांगे. जणूं आपलें कर्तव्यच आहे असें त्याला वाटे. त्या गोष्टी जाईनं ऐकल्या कीं ती त्याला खाऊ खायला देई आणि फिरायला बागेंत घेऊन जाई. आज शाळेंत दारूबंदीची नवी माहिती त्यानं ऐकली होती. आईला ती मुळींच माहिती नसणार तेव्हां आपण घरीं गेल्याबरोबर ती माहिती सांगूं अन् आईला खूप चकीत करूं अशी त्याच्या बालमनाला खात्री वाटत होती. म्हणून शाळेंतून तो अगदीं धांवत धांवत घरीं आला होता आणि गळ्यांतलें दप्तरसुद्धां न काढतां त्यानें आईच्या गळ्याला मिठी मारली आणि आपणच वरील प्रश्न

तिला विचारला.

" अरे राजा पण दतर ठेव ना काढून अगोदर अन् मग सांग काय सांगायचं तें ! "

" थेवतो ग पन अगोदल थांग पाहू दालूबंदी म्हणजे काय आहे का तुला थाऊक ! "

" नाहीं रे तूं सांग पाहूं ! "

" थांब थांगतो हं ! असें म्हणून भगवान दतर ठेवायला आंत गेला. त्यानें खुंटाळ्याला दप्तर अडकविलें. कोट काढून ठेवला आणि परत आल्यावर आईला म्हणाला,

" आई दालूबंदी म्हणजे किनई आपल्या मुंबईतलीं थगली दालूची दुकानं लवतलच बंद व्हायची आहेत ! "

" खलत का ! " बोबड्या स्वरांत जाईनें विचारलें.

" हो ! कॉंग्लेतवाले आहेत ना ते कलनाल आहेत म्हने ती थगली दुकानं बन्द ! "

" अस ! "

" अन् बलका आई आमचे मात्तल थांगत होते की एकदा ती दुकानं बंद केलीं म्हणजे मग कुन्नाला नाहीं मिलायची दालू प्यायला ! "

" आणखी काय सांगत होते तुझे मास्तर ! "

" ते थांगत होते. दालू फाल वाईत असती. तिनं लोकांचं फाल

नुकसान होतं. पैथा फुकत जातो अन् आपन आदाली पलतो. आतां दालूबंदी झाली की आपले पैथे वाचतील अन् आपणाला खूप मदा वाटेल. आई ! खलत का ग दालूबंदी केली म्हणजे छान होईल ? दालू इतकी का वाईत असते ? ”

जाई उत्तर देऊं शकली नाहीं. कसं ती उत्तर देणार ? कारण दारूमुळेंच तर तिच्या सुंदर संसाराचे तुकडे तुकडे झाले होते. दारू नसती तर आज दुसऱ्याच्या घरीं भांडीं घांसून धुणें धुवून आपले आणि आपल्या भगवानाचें पोट भरण्याची तिच्यावर पाळी आली नसती. त्यावेळीं दारूबंदी झाली नव्हती म्हणून तर तिच्या संसाराची राख झाली. पण छोटया भगवानला हें तिनं कधींच सांगितलें नव्हतें अन् तो सारा पांच वर्षांचा. सांगितलें तरी त्याला त्यांतलं काय कळणार आहे ? उगाच आपल्याला मात्र दुःख वाटायचें. एकदां त्यानें सहज प्रश्न विचारला होता— “ आई माझे बाबा कुथ आहत ग ! थगल्या माझ्या मित्लांना बाबा आहेत अन् मलात कथे नाहींत ? आपलया पलीकले लाहतो तो गनू आहे ना त्याला मी विचारलें कीं तुला आहे माहीत माझे बाबा कुथ आहेत ते ! तर तो म्हनाला कीं तुझे बाबा आभालांत गेले आहेत ! खलत कांग माझे बाबा आभालांत गेले आहेत ? अन् येनाल कधीं ते आभालांतून ? ” पण त्यावेळींहि तिनें उत्तर दिलें नव्हतें. पण तिच्या डोळ्यांतले अश्रु पाहून छोटया भगवान्ला वाटलें उगीच

आपण प्रश्न विचारला. आजपर्यंत त्यानें पुन्हा असला प्रश्न विचारला नव्हता. पण त्याच्या आजच्या प्रश्नानेंही तिला वाईट वाटलें. तिच्या डोळ्यापुढें तिचा सारा संसार उभा राहिला. तिचें लग्न ठरलें त्यावेळीं—

आईनं मोठ्या प्रेमानं आपल्या पाठीवरून हात फिरविला आणि आपल्याला अगदीं जवळ घेऊन म्हणाली, " मोठी भाग्याची आहे माझी पोर ! असलं घर मिळायला फार मोठं नशीब लागतं ? " गांवांत केवढ्या थाटांत झालं आपलं लग्न ! रस्त्यावर लोकांच्या पंक्तीच्या पंक्ती जेवायला बसत होत्या. लग्नानंतर प्रथमच आपण सासरी गेलों. आपल्याला कुठं ठेवू अन् कुठं नको असं होऊन गेलं आपल्या सासू सासऱ्यांना ! त्यांचा स्वभावहि किती प्रेमळ होता. एकुलत्या एका मुलाची एकुलती एक बायको. मग त्यांनीं आपलं खूपसं कोडकौतुक केलं यांत आश्चर्य तें कसलं ! सासरी एक दिवस आपण सुंदर नवं पातळ नेसलो होतो. आणि शहरांतल्या मुलीं-प्रमाणं पाठीवर शेपटा सोडला होता. त्या दिवशीं आईबापांची नजर चुकवून ते आपल्याला हळूच म्हणाले, " जाईचं फूल हल्लीं फारच फुलायला लागलं आहे हं ! आणि वास पण किती छान सुटलाय ! " लटक्या रागानं आपण त्यांच्याकडे पाहिलें. आपल्या फुगलेल्या गालावर ते हळूच चापट देणार होते इतक्यांत्....

नोकरीसाठीं मुंबईस जायच्या आदल्या दिवसाची गोष्ट. आपल्या

शेताकांठच्या जांभळीच्या झाडाखालीं आपण बसलों होतों. ते आपल्याला सारखे समजावीत होते. " जाई ! मुळींच वाईट वाटून घेऊं नको. दोन चार महिन्यांत माझ्या लाडक्या जाईला मी मुंबईस नेण्याला पुन्हा इकडे येईन. आतां तूंच जरा विचार कर ! आपलं शेत आहे थोडं. अन् लग्नामुळें आपल्याला जें कर्ज झालं आहे तें नको कां फेडाया ! रडूं नको ! नीट वाग हं ! मी तेथें पोंचलों कीं तुला कागूद लिहीन हं ! " पण आपल्याला रडू आवरेना. फाटक्या धोतराच्या टोंकानं त्यांनीं आपले डोळे पुसले आणि आपल्याला अगदीं जवळ घेऊन ते म्हणाले, " जाई असं काय बरं लहान मुलासारखं ! "

आणि खरोखरच चार महिन्यांनीं आपल्याला मुंबईला न्यायला ते आले. किती आनंद झाला होता आपल्याला त्यावेळीं. मुंबईचा मोह सर्वांनाच असतो. पण संधि मात्र आपल्यासारख्या फारच थोड्यांच्या वांट्याला येते. " मुंबईला न्यायला आले आहेत. उद्यां आम्ही मुंबईला जाणार ! " असं आपल्या सगळ्या मैत्रिणींना सांगतांना आपणाला किती आनंद वाटला होता !

आगगाडींत ते आपल्याला कितीतरी माहिती सांगत होते. आपण मुंबईस नव्हतों तेव्हां दिवसभर काम करून आपल्याला अन्न शिजवायला फार त्रास पडे, पण आतां तूं आलीस कीं आपली पोटाची काळजी मिटली. आपण दोघं मुंबईंत अगदीं राजाराणी-



२

सारखं रहायचं हं ! पगाराच्या दिवशीं आपण सिनेमा पहायला जाऊं. मुंबईंत कसे छान सिनेमा आहेत. आपण फिरायलाहि जात जाऊं सुट्टीच्या दिवशीं. वगैरे बरीच माहिती त्यांनीं आपणाला सांगितली आणि नवे नवे बेतहि केले.

आपण मुंबईला गेल्यानंतर चवथ्या महिन्यांतच यांचा पगार वाढला. पगार हातीं पडल्यावर एक छान पातळ घेऊन हे घरीं आले. आणि आल्याबरोबर म्हणाले, " जाई ! हें बघ पातळ आणलय् तुला ! आजपासून किनई पगार वाढला माझा ! "

" खरंच ! "

" हो ! आणखीही एक गंमत आणणार होतों ! "

" गंमत ! कसली ? "

" सांगूं ? एक आंगडं आणणार होतों. कुणासाठीं आहे माहीत ? " किती लाजलों आपण त्यावेळीं. ते पुढें म्हणाले, " आपल्या पहिल्या मुलाचं नांव भगवान ठेवायचं हं ! देवाच्याच कृपेनं आपला संसार कसा सोन्यासारखा चालला आहे ! "

मुंबईंत अमृत आणि विष दोन्हीहि आहेत. पण गरिबांच्या वांट्याला मात्र त्यांच्या अज्ञानामुळें विषच येतें. मैत्री ही जशी तारक आहे तशीच मारक आहे. पगारवाढीच्या दिवशीं मित्रांनीं यांना खूप आग्रह केला, म्हणून यांनीं पहिला दारूचा घोट घेतला. आपण त्यांची कानउघाडणी केली. पुन्हा कधींहि दारू न पिण्याचं

त्यांनीं कबूल केलं. पण तें त्यांनीं पाळलें नाहीं. यांची रात्रपाळी सुरू झाली. कामाचा खूप त्रास होतो म्हणून ते अगदीं थोडी मित्रांच्या खर्चानेंच घेऊं लागले.

मी बोललें कीं रात्रीच्या कामाचा त्रास होतो म्हणून घेतों. आतां रात्रपाळी संपली कीं मी कधींहि घेणार नाहीं, असें ते मला म्हणाले. आपला त्यांच्यावर विश्वास बसला. पण रात्रपाळी संपल्या-नंतर सुद्धां त्यांनीं अनेक वेळां दारू घेतली आणि मीहि त्यांना अनेक वेळां बोललें. मी बोललें कीं त्यांना वाईट वाटे पण नंतर मात्र ते पुन्हा पीत.

बाळंतपणासाठीं आपण माहेरीं आलों. येतांना पैसे पाठविण्या-बद्दल आणि पत्र पाठविण्याबद्दल आपण त्यांना कळकळून सांगितलें. पण त्याचा उपयोग झाला नाहीं. चार महिन्यांनीं आपण भगवानला घेऊन जेव्हां मुंबईस आलों त्यावेळीं ते पुरे दारूबाज बनले होते.

मुंबईस आल्यानंतर दुसरेच दिवशीं आपण त्यांना दारू न पिण्याबद्दल विनंति केली. काडकन् आपल्या मुस्कटांत देऊन ते म्हणाले, "मी काय प्यावें तें सांगायचा तुला काय अधिकार !"

दारू हें साधें व्यसन नाहीं तें एक भयंकर व्यसन आहे. आपल्या शरिराकडे, आपल्या कर्जाकडे, आपल्या उत्पन्नाकडे तें व्यसन माण-साची दृष्टि पोहोंचवूं देत नाहीं. बायको-मुलगा-माणुसकी यांच्याकडे माणसाला लक्ष द्यायला तें फुरसत देत नाहीं. माणूस एकदां या

व्यसनाच्या आहारीं गेला म्हणजे तो पशू बनतो. प्रेमाचीं बंधनं, ममतेचे पाश त्याला आडवूं शकत नाहींत.

ते आपल्याजवळ पैसे मागत. पण जर आपल्याजवळ पैसेच नसत तर आपण देणार कुठून ? आणि पैसे नाहींत म्हणून आपण सांगितलें कीं ते किती भयंकरपणें आपणाला मारत. एकदां आपली मैत्रीण आपल्याकडे आली होती. तिनं जातांना खाऊसाठीं छोट्या भगवानच्या हातीं एक रुपाया ठेवला. तिचें पाऊल घराबाहेर पडतें न पडतें तोंच त्यांनीं किती जोरानं त्याच्या हातून तो दारूसाठीं काढून घेतला. ते दिवसेंदिवस जास्तच दारूबाज बनत. शिव्यांची तर अशी खैरात करीत कीं मराठी पांचवीपर्यंत यांनीं शिक्षण घेतलं आहे असं कुणालाही खरं वाटलं नसतं. पैशासाठीं यांनीं कर्ज काढायला सुरवात केली. दाराशीं पठाण येऊं लागले. दुपारीं खायची पंचाईत पडूं लागली. घरांतल्या दागिन्यांचा तर केव्हांच निकाल लागला. शेवटीं आपण चार घरीं भांडीं घांसणं, कपडे धुणें इ. कामें करून पैसे मिळवूं लागलों अन् आपलं व भगवानचं आणि यांचं पोट भरूं लागलों. पण यांना तेंही बघवेना. ते म्हणत जास्त काम कर आणि पैसे मिळव आणि मला दे !

भगवानला सांभाळून ही कामं करायची व घरीं आल्यावर यांच्या हातचा मार अन् शिव्या खायच्या. असं जात होतं आपलं आयुष्य. एकांतांत बसून आपण कितीतरी वेळां रडलों. पण अश्रूला

भीक घालण्याइतकी दारू लेचीपिची थोडीच आहे ! सासूसासऱ्यांकडून पैशाची मागणी येई. पण पैसेच नसत तर पाठविणार कुठून ? हे दारू पितात हें आपण त्यांना मुद्दामच कळविलं नव्हतें. उगाच त्या म्हाताऱ्यांच्या जिवाला त्रास व्हायचा. माणसाची आशा अमर असते. यांना उपरती होईल, दारूच्या व्यसनांतून हे सुटतील अशी आपल्याला आशा वाटत होती. पण....

शेजारचा सखा एके दिवशीं आपल्याला बोलवायला धांवत धांवत आला. लगेच आपण त्याच्याबरोबर गेलों. हॉस्पिटलमध्यें कॉटवर ते पडले होते. त्यांच्या छातीवर जबरदस्त दुखापत झाली होती. संध्याकाळीं नेहमींपेक्षां खूपच जास्त दारू पिऊन ते घरीं येत होते. वाटेंत रस्ता ओलांडतांना ते एका टॅक्सीखालीं सांपडले. तेथून त्यांना हॉस्पिटलमध्यें आणलें होतें. आणि अगदीं अत्यवस्थ स्थितींत ते कॉटवर पडले होते. बिलकुल बोलायचं नाहीं व रडायचं नाहीं हें कबूल असेल तरच आंत जायला मिळेल असें बाहेरच बजावलें असल्यामुळें धडधडत्या अंतःकरणानं आपण त्यांच्या कॉटजवळ नुसते उभे होतों. त्यांनीं डोळे उघडून आपल्या अश्रुपूर्ण नेत्रांकडे पाहिलें. त्यांच्या डोळ्यांत अश्रु चमकले. त्यांच्या आयुष्यांतले शेवटचेच अश्रु होते ते !

जाईच्या डोळ्यांतून पाणी वाहूं लागलं. छोट्या भगवानला वाटलं उगीचच आपण आईला विचारलं. तो म्हणाला, " आई दारू-

बंदी कळतात ते चांगलं नाहीं होय !"

"चांगलं आहे कीं. दारूबंदी केली म्हणजे फार छान होईल."

"मग तूं ललतीस का?"

तिला जास्तच रडूं आलं. तिनं त्याला आपल्या पोटाशीं घट्ट धरलं. पण त्याला तेथें बसवलं नाहीं. रस्त्यावरून दारूबंदीप्रचारार्थ एक प्रचंड मिरवणूक जात होती. ती त्याला पहायची होती. आईच्या हातून तो निसटून धांवत धांवत खिडकीजवळ आला. मिरवणूक खूपच मोठी होती. सर्वांनीं खादीच्या टोप्या घातल्या होत्या आणि कॉंग्रेसचे तिरंगी झेंडे आघाडीवर फडकत होते. निरनिराळ्या पाट्या कांहीं लोकांच्या हातीं होत्या. त्यांवर दारू ही किती भयंकर आहे तें लिहिलेलें होतें. मिरवणुकींतले लोक म्हणत होते "दारूबंदी की जय !"

त्याचें भान सुटलें. आपण जणूं काय मिरवणुकींतच आहोंत असें त्याला वाटलें. आणि तो जोरानें ओरडला, "दालूबंदी की जय !"

—श्री. श्री. घारे.

(पुणें)



# ३

## बापाची समजूत

गाढ झोंपेंत होतों. मध्यरात्रींची वेळ. पण एकदम दचकून उठलों. शेजारीं गडबड झाली. रावजीनानांच्या घरांतच ही गडबड चालली होती. दहाबारा पोलिस आणि दहापंधरा इतर लोक यांनीं रावजीनानांचें घर वेढलेलें होतें. बायकामुलें जागीं झालीं. नानाहि उठून बसले. त्यांना कांहीं उमजच पडेना. इतके लोक आणि त्यांतून पोलिस व पोलिस अधिकारी ! रावजीनाना भांबावून गेले. पण ते जागे होतांच पोलिस सबइन्स्पेक्टर पुढें झाले आणि 'तुमच्या घराची झडती घ्यावयाची आहे' म्हणून त्यांनीं नानांना सांगितलें.

'कां ? कशाबद्दल ?' म्हणून नानांनीं धीर करून विचारलें.

'आम्ही अबकारी खात्याचे पोलिस असून तुमच्या घरीं बिगर-परवाना काढलेली दारू आहे असा आम्हाला सुगावा लागला आहे आणि त्यासाठीं ही झडती घ्यावयाची आहे' असें पोलिस अधिका-

त्यानें सांगितलें.

रावजीनाना अधिकच घोटाळ्यांत पडले. बिगरपरवाना काढलेली दारू आणि ती आपले घरांत ! त्यांना आश्चर्य वाटलें. पण अधिक विचार करायला त्यांना सवड नव्हती. पोलिसांना घर दाखविणें भाग होतें. पोलिस अधिकाऱ्यानें घर शोधलें. त्यांना आगाऊ कळलेल्या माहितीप्रमाणें देवघराचे उत्तर बाजूस असलेल्या अडगळीचे कोनाड्यांत त्यांना एक दारूची बाटली सांपडली ! ही बाटली अर्धी भरलेली होती आणि कोणाला दिसूं नये म्हणून ती फडक्यांत गुंडाळून ठेवलेली होती. पोलिसांनीं त्या बाटलीचा पंचनामा केला आणि रावजीनानांचा ह्या बाटलीबाबत जबाब घेतला. नानांना ह्या बाटलीबद्दल कांहींच माहीत नव्हतें. ते बिचारे काय जबाब देणार ? परंतु बाटली त्यांचे घरीं सांपडल्यामुळें त्यांना गुन्हेगार ठरवून व कागदपत्र रंगवून पोलिस निघून गेले.

इतकें होईपर्यंत पहाटे चार वाजण्याचा सुमार झाला. मी हा सर्व प्रकार पहात होतोंच. मलाहि झाल्या प्रकाराबद्दल सखेद आश्चर्य वाटलें. नंतर मी झोंपलों नाहीं. अंथरुणांत पडल्यापडल्या विचार करीत होतों.

रावजीनाना म्हणजे गांवांतील एक थोर माणूस. भलेपणानें वागून व रात्रंदिवस उद्योग करून त्यांनीं प्रपंच कसा रंगाला आणलेला होता. वडिलार्जित जमीनजुमला दुपटीवर नेऊन सावकारीहि

सुरू केलेली होती. तरी दुसऱ्यांना लुबाडण्याची इच्छा नसल्यानें व्यवहार सरळ करीत असत. त्यामुळें आमचे गांवांत रावजीनाना सर्वांना आवडते झालेले होते. त्यांनीं एक चांगला वाडा बांधलेला होता आणि घरीं गाईबैलांचा खटला व नोकरचाकरहि बरेच होते.

पण असें असूनसुद्धां त्यांच्यावर हा प्रसंग आला होता. दुसरे दिवशीं सगळ्या गांवांत ही बातमी फुटली व सगळा गांव हळहळूं लागला. मग गांवांत चर्चा सुरूं झाली आणि खरा प्रकार बाहेर येत चालला. रावजीनानांचा वडील मुलगा साहेबराव यांचा हा प्रताप होता. साहेबरावानेंच आपल्या एका मित्राकडून काढून आणलेली दारू त्या बाटलींतून घरीं आणून ठेवलेली होती. त्याच्याच दुसऱ्या एका मित्राकरवीं पोलिसांना ही वर्दी पोंचलेली होती. वर उल्लेखिलेला प्रकार घडला त्यादिवशीं शेजारच्या एका गांवीं सिनेमा पाहाण्यास साहेबराव गेला असल्यानें रावजीनाना पोलिसांना आरोपी म्हणून सांपडले ! मागाहून त्यांनाही खरा प्रकार कळला. पण मुलावरच्या मायेनें त्याचा अपराध त्यांनीं उघडकीस येऊं दिला नाहीं व आरोपाची सर्व जबाबदारी निमूटपणें आपले आंगावर घेतली. पुढें रीतसर खटला होऊन रावजीनानांस तीन महिन्यांची शिक्षा व पाऊणशें रुपये दंड झाला !

कारण नसतां अब्रू गेली. पैसाही खर्च झाला आणि मुलाबाबत मनांत धरलेली आशाहि मावळली. त्यामुळें रावजीनानांना उतार-

वयांत फार दुःख झालें. अलिकडे ते अगदीं उदासीन असतात आणि रंगाला आलेला प्रपंच ढांसळत चाललेला उघड्या डोळ्यांनीं पहात असतात !

साहेबरावावर रावजीनानांचें फार प्रेम. थोडया उशिरानेंच झालेला पहिला मुलगा आणि त्याच्या पाठीवर तीन मुलींच झाल्या. त्यामुळें त्याचे लाड अधिकच पुरविले गेले. आतां उतारवयांत नानाला आणखी एक मुलगा झाला आहे खरा; पण प्रपंचाच्या सुरवातीला झालेला मुलगा म्हणून साहेबरावांचेंच कोडकौतुक नानांनीं फार पुरविलें. खाण्यापिण्याला आणि कपड्यालत्त्याला तर त्याला कांहीं कमी पडूं दिलें नाहींच पण इतर चैन करण्यालाही त्याला मदतच केली. शाळा सोडून उनाड मुलांच्या संगतीनें शेजारच्या गांवीं जत्राखेत्रा किंवा नाचतमाशे पाहायला साहेबराव गेला आणि नानांनीं त्याला अडविलें असें कधीं झालेंच नाहीं. साहेबरावाची आई बिचारी चडफडे पण तिचें कोण ऐकतो ? पुढें लवकरच साहेबरावांनीं शाळा कायमचीच सोडली आणि तो तालमीच्या आखाडयांत जाऊन पहिलवान बनून राहिला. मुलगा शिकावा आणि शहाणा व्हावा अशी बापाची इच्छा होती पण ती पुरी होण्याचें चिन्ह दिसेना. तेव्हां निदान शरीरसंपदा मिळवून तो घष्टपुष्ट तरी होऊं दे अशी रावजीनानांनीं आपली समजूत करून घेतली.

एके दिवशीं चमेली डोंबारीण त्यांचे गांवीं आली. गाण्यांत तर

चमेली तरबेज होतीच; पण नाचण्यांत आणि हावभाव करण्यांत ती इतकी वस्ताद होती कीं, तरुण पोरेंच काय पण म्हातारीं माणसेंहि तिच्यावर फिदा होऊन जात. साहेबराव एकदां आपल्या मित्रांसह तिच्या बैठकीला गेला आणि तिच्यावर इतका बेहद्द खूष होऊन गेला कीं, तीनचार महिने तो तिच्यामागेंच परगांवींहि हिंडूं लागला. दिवसा घरीं यथेच्छ जेवण करावें आणि झोंप काढावी व रात्रीं गांवें हिंडावीं असा त्याचा क्रम सुरू झाला. आरंभीं आरंभीं रावजीनानांच्या हें लक्षांत आलें नाहीं. पण त्यांच्या एका कुळा-कडचे पांचशें रुपये परभारें नेऊन साहेबरावानें उडवून टाकल्याचें जेव्हां त्यांनीं ऐकलें तेव्हां त्यांना अत्यंत दुःख झालें. त्यांनीं जवळ घेऊन साहेबरावाला उपदेश करून पाहिला आणि एकदां तर त्याच्या एक कानशिलांत लगावूनही त्यांनीं त्याला ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न करून बघितला पण कांहीं उपयोग झाला नाहीं.

डोंबारणीच्या मागें लागल्यावर साहेबरावाला दारूचीहि संगत जडली आणि चमेलीची धाकटी बहीण म्हवनी हिला तर कायमचीच रखेली म्हणून ठेवण्याचा त्यानें बेत केला. ह्याच सुमारास त्यानें बिगर-परवाना गाळलेली दारू आपल्या एका मित्राकडचीं आणून घरीं ठेवून दिली होती.

रावजीनानांना वाटत होतें कीं, आपल्याला काय कमी आहे ? आपली वडिलार्जित इस्टेट एवढी मोठी आहे कीं, दोन पिढ्या

सरायची नाहीं. त्यांत आपण पुन्हा भर टाकून देऊं म्हणजे मुलें किती खातील आणि किती नासतील ? मुलांच्या बाबतींत बापाचें कर्तव्य म्हणजे खूप पैसाआडका आणि जमीनजुमला मिळवून ठेवणें एवढेंच आहे अशी रावजीनानांची समजूत होती. आणि पुष्कळ बापांची समजूत अशीच असते. पण मुलाला चांगलें वळण लावलें नाहीं, चांगलें शिक्षण दिलें नाहीं आणि चांगला उद्योगी बनविलें नाहीं तर त्याचें खरें हित व्हावयाचें नाहीं हें त्यांना कळत नाहीं आणि त्यामुळें पुष्कळ वेळां सर्वस्वीं वाटोळें होतें. रावजी-नानांची आज अशीच स्थिति झाली आहे. साहेबरावाचें दारूचें व्यसन वाढत चाललें असून त्याच्याबरोबर सर्व प्रकारची अवकळा त्यांचे घराला प्राप्त होत चालली आहे. गरीब बिचारा रावजीनाना !

—कृ. भा. बाबर.
( अहमदनगर )



# ४

## नीतीला नांगरणारी – दारू !

“शेतसाऱ्याचा वसूल शेतकऱ्यांचीं हांडींमडकीं नि गुरंढोरं विकून करणारं कॉँग्रेस मंत्रिमंडळ – गिरणीकामगारांच्या धुगधुगत्या जीवनाचा सरसहा रक्तशोष करून फुगूं देणाऱ्या ह्या मालकांच्या जळवा - साक्षरताप्रसाराचा सारा भर सुशिक्षितांच्या बेकारावस्थेचा फायदा घेऊन नि त्यागाच्या मधाचं बोट तोंडाला लावणारीं हीं कॉँग्रेसचीं मंत्रिमंडळें—आतां दारूबंदी करायला निघालीं आहेत म्हणे !

—दारूबंदी ! ! !

चैनी चंडोलांची दारू बंद करा ! !

मजुराच्या जीवनांतील क्षणिक आनंद हिरावून करोडो अंतःकरणांचें कर्णकट्टू तळतळाट कशाला घेतां म्हणावं !

तीन चार आण्यांची दहाबारा तासांची कष्टतर मजुरी करावी.

घरीं परतावं — घर कसलं म्हणायचं — पशूंच्या गुहा नि पक्ष्यांचीं घरटीं तरी बरी—इतकीहि निश्चित निवाऱ्याला जागा त्या चंद्रमौळी खोपटांत नसावी. तिथंच चारपांच सांपळे गोदडीच्या रकट्यावर ‘ भाकर — भाकर ’ करतां करतां झोंपलेले असायचे. त्यांना जन्म देणारी स्त्री जेमतेम लज्जा रक्षण होईल इतकी वस्त्रसंपत्ति अंगावर लेवून अन् खापराच्या परातींत दोन तीन भाकरीवर तिखट लसणीचा गोळा ठेऊन वाट पहात असायची.

—त्यावेळीं आमचे हे म्हादबा, तुकाराम, आनंदा नि सख्या निथळल्या कष्टानं खोपटांत शिरणार. सुखदुःखाच्या गोष्टी तिथं कसल्या ऐकायला मिळणार ?

तिथं सारं दुःखच — तिथं सारा उन्हाळा — तिथं सारा अग्नि नि तिथंच त्याचा भडकाहि पण होतो.

सांगा — त्या शिणलेल्या शरीरानं दिवसभराचे कष्ट नि खोपटांत शिरल्यांनतरची ती अंतःकरणाची खांडोळी करणारी एकजात चित्रमाला पाहिली म्हणजे त्यानं काय सारी रात्र त्या दुःखाच्या तापलेल्या तव्यावर तळमळत — तडफडत काढायची ?

—आणि मी विचारतों — कां काढावी ?

प्रत्येक प्राणिमात्राची हाव सुखाच्या सांठ्याकडे सारखी भरधांव चालू असतां त्यानं त्यापासून अलिप्त कां रहावं ?—

‘ एका तोफेतून सुटलेला गोळा सात मैलांतील प्रदेशाचा धुव्वा

उडवील पण एक दारूची बाटली आपल्या मागील अन् पुढील सात पिढ्यांचा नाश करते.'

कोण नाहीं म्हणतो !

दारू ही वाईट आहे – नुसती वाईटच नाहीं तर जीवनाचा होरपळा करणारी आहे. पण लक्षांत ठेवा 'जीवन' हा शब्द या ठिकाणीं फार महत्त्वाचा आहे.

जीवन ?—आहे कां तुम्हांपैकीं एकाला तरी ?

श्रीयुत दाते यांच्या कुत्र्यालाहि तुमच्यापेक्षां जास्त अक्षरओळख असावी – गाढवासारख्या राबणाऱ्या भिकार प्राण्यापलिकडे करावे लागणारे कष्ट – तीनचार फाटक्या शरिरांची धुगधुगी टिकेल इतकीच मिळकत – भांडवलवाल्यांच्या पापी – काक दृष्टीपासून शरिराचा बचाव करूं पाहणारी नि लज्जेनं काळवंडलेलीं तीं लक्तरं....

ह्या काय जीवनाच्या साक्षी ?

—कां प्रळयकाळच्या उफाळलेल्या दुःखाचा महोदधी !

सकाळपासून संध्याकाळपर्यंत ह्या दुःखाच्या दर्यांत लाटांच्या टांचा खातां खातां उरलेले आठहि तास त्यांतच गटांगळ्या खात काढावेत कां ?

सोळा तासांचा दुःखांकित सोहळा एका बाटलीच्या भरंवशावर निद्रेच्या नितांत विश्रांतींत नि विस्मृतिच्या अविरत आरामांत काढायला तुम्हाला कां बरं बंदी ? जर तुम्ही मिळवीत तर

सांगा ! तुम्ही ओरडून सांगा कॉंग्रेस मंत्रिमंडळाला कीं बापहो— अगोदर आम्हांला या खाईंतून काढा ! ह्या दुःखाच्या वणव्यांतनं ओढा——

——मग ह्या प्रचंड आगीवर — साधी मीठभाकरी जाडंभरडं वस्त्र— स्वच्छ वस्तीची झोंपडी — अक्षरओळख, नि विचार अशा पांच पंपां-तनं पाणी पाडा, अन् प्रथम ही आग विझवा.

प्लेगचा कहर गुदरला म्हणजेच समाज असुरक्षित तट्टयाच्या झोंपडींतील गैरसोयीकडे लक्ष न देतां काळ कंठतो.

प्लेग गेला कीं त्या झोंपडीची त्याला आवड रहात नाहीं नि गरज तर मुळींच उरत नाहीं.

आम्हाला जीवन द्या अन् मग दारूबंदी ! !

आपणांला जीवन प्राप्त करायचें आहे अन् त्यासाठीं आपण ही चळवळ हातीं घेतली आहे.

जे जीवनानंद उपभोगतात त्यांना दारू पिण्याचा अधिकार नाहीं. त्यांना पकडून लागेल तर सार्वजनिक फटके मारा, पण आम्हांला पोटावर मारतां मारतां पाठीवर मारूं नका !

म्हादबांनो -- धोंड्यांनो नि सख्याहरींनो ! लक्षांत ठेवा हा सारा कावा भांडवलशाहीचा आहे. मदिरा — मीनाक्षीच्या आहारीं जाऊन सारी संपत्ति संपेल नि मग मजूर होऊन तुमच्या — आमच्यांत सामील व्हावं लागेल. ह्या भयंकर भीतीनं -- भेडसावणाऱ्या भिषणतेनं ह्या भ्याड

भांडवलवाल्यांनीं हा मानभावी डाव भिरकावला आहे.

आज मी तुम्हांला एवढेंच सांगतो कीं, खादीपासनं जसे कोष्टी नि तदनुषंगिक धंदेवाले पोसले जातात तसेंच दारूपासूनहि कित्येक मजुरांना जीवनाच्या धुगधुगीचा आसरा प्राप्त होतो.

सांगा -- बोला ! तुम्ही तुमच्या जातभाईचे मारेकरी होणार ? त्यांच्या आयुष्याला काडी लावायची आहे तुमची तयारी ?

—नाहीं. आपल्यांत ती असणारच नाहीं ! मनुष्यजातीच्या माणुसकीवर -- आयुष्याच्या आशेवर, जीवनाच्या ज्योतेवर नि खचत चाललेल्या खोंपटावर जळजळीत निखारा निर्विकार अन् निर्भीड मनानं ठेवायला भांडवलवाल्यांचंच उदार अंतःकरण पाहिजे !

आपल्या लोकांचं दरिद्री अंतःकरण काय कामाचं ! ! ”

—आणि इतक्यांत सभेच्या डाव्या बाजूला कांहीं गडबड झाली.

लोक उठले – दिवे फुटले – विझले.

सभा उधळली गेली.

भांडवलवाले जिवावर उठले म्हणून भाई सदानंदाचं डोकं फुटेल फार तर, पण तत्त्वाच्या तळमळीनं विव्हळणारं अंतःकरण विझणार कसं ?

* * *

कित्ती कित्ती जीव तोडून बोललांत त्या दिवशीं तुम्ही सदानंद ! अंतःकरणाची खरी तळमळ भडाभड ओकण्याच्या भरांत तुम्ही जळ-

जळीत निखारा ह्या दारिद्र्याच्या दारुण भुसकटवार आपल्याच हातानं भिरकावलात. त्याला कां एकदां आग लागली -- भडका उडाला -- तर गोष्टी कोणच्या थराला जातील याचा कांहीं विचार केला होता कां ?

दरिद्री जनतेच्या जनार्दना ! जीव कीं प्राण जाणणाऱ्या तुझ्या जिजाई -- जनाईंच्या सौभाग्याचा कांहींच कां प्रश्न तुझ्यापुढं उभा राहिला नाहीं ? ठिगळा ठिगळांनीं झांकत आणलेली त्यांनीं आपली जपलेली अब्रू अशी विचारांची दुष्ट मुसुंडी मारून फाडलीस -- निगळ्याला शोभा आणणाऱ्या किडुकमिडुकांनींच त्यांच्या गळ्याला गळफांस बसावा असा बाण ह्या तुझ्या आवडत्या आनंदा -- सख्या-हरींच्या हातीं दिलास ?

बाटलाबाईची तरफदारी कां केलीत हें मी जाणलं. तुमच्या ज्या कांहीं जीवनाबद्दलच्या कल्पना आहेत त्यांना मूर्त स्वरूप दाखविण्याच्या भरांत -- त्या उन्मादाच्या -- त्या महत्त्वाकांक्षेच्या मोहांत -- त्या आकांक्षांचं दिव्य स्वरूप ठसविण्याच्या जोसांत तुम्ही भलतच भकलात ! !

नका -- सदानंद -- भलत्याच भरीस पडून आजपर्यंतच्या सगळ्या कामगिरीवर पाणी पाडूं नका !

सदानंद -- वर बघा ना ! मी तुम्हांला शहाणपण शिकवत नाहीं. तुमची तळमळ नाटकी आहे -- तुमची तुमच्या भाईबंदाबद्दलची

अंतःकरणाची भकभक खोटी आहे – असं कसं म्हणूं मी ?

चालून आलेल्या मानाच्या नोकरीला लाथ मारलीत नि जेव्हां चळवळीचा धुरा खांद्यावर घेतलात – कोणं आनंद झाला होता आपणा दोघांना त्या दिवशीं —

तें पवित्र वातावरण शुचितेंतच विलीन पावलं पाहिजे. त्याग करायला निघाल्यानंतर दारुच्या क्षणिक मोहाचा अंमल आपल्या अंगावर घेऊन अगणित अंतःकरणांना उघडया डोळ्यानं आग लावण्याचं पातक कां करतां ! बोला सदानंद, गप्प कां बसलांत ?

— सारी शब्दसंपात्ति दारिद्र्याचं वर्णन करतां करतां दरिद्री झाली कां ? विचारवंत भाई आज तो वाक्प्रवाह कुठल्या वाळूंत लुप्तप्राय झाला ? बोला ना सदानंद —

त्या दिवशींच्या तुमच्या व्याख्यानानं भावनावादीच लोक रडले नाहींत – पण मी सुद्धां रडले ना सदानंद.

भावनेला जिनं जितं जाळलं त्या ह्या तुमच्या सुलूच्या डोळ्याच्या कडा ओल्या झाल्या नि हृदय गदगदून स्पंदन पावलं ! !

अन् तुम्हांला माहीत आहे कां आपल्या भाषणाची परिणति ?

तो जिजा तेलणीच्या पलिकडे रहाणारा तुमचा आवडता आनंदा रोडके – काय ग बाई तरी त्यानं झोडपलन् गुरासारखं आपल्या बायकोला.

सदानंद ! क्षणिक सुखाचा मोह माणसाला माणुसकीपासनं

पारखा करतो बरं ! !

बायको ती त्याची. पण निर्लज्ज्यानं तिला विवस्त्र करायला पुढें केलेला हात जिजा तेलणीनं जळत्या लाकडानं डागूनच मागें केला. गर्दी किती जमली. विचक्षणा किती झाली. पण आनंदा लटपटत्या पायानं नि जळलेल्या हातानं ओरडत होता— 'सदानंदच म्हणाले कीं दारु प्या – अगदीं सपाटून प्या.'

बघा सदानंद – भावनेच्या भरांत तत्त्वाची प्रतिष्ठा पटविण्यासाठीं सुद्धां सामाजिक चर्चेत जिभेला लगाम घालायला हवा. तुमच्या शब्दांचा परिणाम म्हणजे आजच्या ह्या वस्तींतल्या सगळ्या बायकांची मारहाण नि अब्रूचे धिंडवडे.

कां असं आपल्याच हातानं आपल्याच समाजाच्या नीतीला नख लावतां ?

दारु ! !

सदानंद – भाऊसाहेबांची संपत्ति दारुच्या ओलाव्यानं भिजलेली होती म्हणूनच आपण आपल्या अनाथालयाला मदत म्हणूनहि नाकारली ना !

मी जी त्यांच्यापासनं वेगळी राहते ती त्यांच्या दारुच्या प्रेमामुळंच ना ! !

मग सदानंद........

—अन् खरच गडे. तुम्हीसुद्धां नाहीं कां गरीबींतनं वर येऊनहि

वाढून आलेल्या सुखावर लाथ मारलीत. कित्ती धन्यता वाटली मला.

हं – सदानंद इकडं बघा. तुम्ही जर असं दारुचं प्रेम वाढू दिलंत तर .... तर – माहीत आहे कां – मलाहि पण प्रेमाची दारू आपल्याला पाजावी लागेल – त्याला नाहीं अं कॉंग्रेसची बंदी !

*　　　*　　　*

बरं कां रे ये सद्या – परवाची एक गंमत सांगतो. पण कां रे – ही डोक्याला पट्टी – ही कैद्यासारखी वाढलेली दाढी – नि मळलेले कपडे – गलिच्छ खोली – आँ ? काय रे हें सदानंद – अहो भाई ?

कां ? मारलीन् वाटतं सुलूनं........

हं ऽ हं – तसं कांहीं नाहीं म्हणा – पण आपले तुम्ही बोडक्या डोक्याचे भाई नि ती ' अनाथ ' शेपटेवाली सेविका ! मारलान् वाटतं शेपटीचा तडाखा. अरे बाबा – ह्या मुली म्हणजे पाली बरं पाली ! शेपटी अडकली नि तुटली तरी मागं न पहातां पुढं पळणाऱ्या ह्या अन् पुनः चुक् चुक् करायलाहि तयारच !

बरं – जाऊं दे तें तुमच्यामतें पांचट पुराण !

काय झालं त्या दिवशीं बरं — हं – आठवलं. तो आपला बुढ्ढा छाप भाऊसाहेब दुपारच्या वेळीं आला माझ्याकडं. साधारण अंदाज असेल एक–दीडचा. ऊन बाहेर कोण, पण स्वारीला तल्लफ आली ना ?

मी आपला वाळ्याच्या ताटींत – विजेच्या पंख्याच्या गार वाऱ्यांत एकाद्या वाघासारखा पडलों होतों. वाघ कां म्हणायचं – लक्षांत आलं कां ? अरे आम्ही मांसाहारी ना. मग आम्हांला घनदाट थंड ठिकाणीं नको कां आपला देह विश्रांतिकरतां ठेवायला. अन् त्यांतून पुन्हा मदिरा – ही इहलोकीची अमृताची बाटली. मग काय विचारतोस – बस्स !

त्या जोडीला कां मदिराक्षि असली कीं तुमचे सारे स्वर्ग तुच्छ आहेत त्या सुखापुढं. आम्ही इंद्र असतो अशा वेळीं.

आज असं काय होतंय – त्या थेरड्याची गंमत राहिलीच बाजूला—

हो – तो आला उन्हांत धडपडत नि बरोबर आणला होता एक वकील. आम्ही पडलों बॅरिस्टर मग असले पाहुणे आल्यावर झाली कटथ्रोटला सुरवात.

डाव रंगात आला नि बाटल्या निघाल्या. ऐसा रंग चढला म्हणतोस सदानंद, कीं तुझ्या कोणच्याहि व्याख्यानाला आला नसेल.

अन् बुड्ढा रंगला.

तो ढंगबाज वकील दंग झाला.

–अन् मी तर्र ऽऽ होतो.

तसा तो वकील काय म्हणाला बुढ्याला कीं असेल तुझी पोरी-

वर सत्ता तर दाखव बोलावून ह्या ठिकाणीं.

तो वकिली डाव त्यानं कां टाकला हें मी तुला सांगायला नको. तुझं अन् त्याचं सुलूच्या बाबतींत एकदां चांगलच खटकलं होतं म्हणे. तेव्हांपासून स्वारी होती सापासारखी डूग धरून. नि साधली संधी.

बुढ्याला जोर चढला. अन् लागला बकायला कांहींच्या बाहींच. सभ्यतेची सीमा संपली. त्यांतच त्यानं चिठ्ठी पाठवून सुलूला बोलाविली.

'सुलू' — खरोखर आली महाराज दाण दाण करत हॉलमध्यें.

उन्हानं चेहरा लाल झाला होता. नाहीं — तो धर्मबिंदूनं—दंवबिंदूनं फुललेल्या गुलाबाच्या फुलासारखा मोहक झाला होता. गालावरील लाली तुडवीत कुरळ्या केसांचा नंगा नाच चालला होता. वक्षस्थलाला विभागणाऱ्या क्षितीजावर लॉकेटची चंद्रकोर डोकं वर काढीत होती. छे — याहिपेक्षां सरस म्हणजे — सरोवरांतील तुफानानं वर खालीं होणारी होडी कशी मादक हेलकावे देते तशीच ती लॉकेटची कोर दमून आल्यामुळं वर खालीं होणाऱ्या उरोभागावर चित्तवेध करणारी ठरली. सुलूच्या सांवळ्या रंगाला शोभून दिसणारी फिकी अस्मानी साडी नि त्यावरला तो तसलाच ब्लाऊज........

असा रागानं पाहूं नकोस — हो बाबा. कळलं ती तुझी प्रिया आहे म्हणून. अन् खरंच ते — ते — काय म्हणतात रे त्याला — हं-

आपलं पावित्र्य विडंबन होत असेल म्हणून वाटतं ही मारकी नजर.

पण भाई ! काय सांगूं तुला सत्याहरी ! !

तिशीचा वकील तर विरघळलाच पण प्रत्यक्ष तिचा जन्मदाता पिता -- तो चांगला म्हातारा झालेला भाऊसाहेब त्याचीहि मति फिरली.

अन् मी – हा प्रकार बघून अधिकच वाहवलों.

हॉलमधली किंकाळी ऐकून आमचा म्हादबा माळी धांवला.

त्यानं तो प्रकार पाहिला. आम्हीहि त्याची ती उची पुरी दहयष्टी – दणगट मनगट अन् रांकट चेहरा पाहिला मात्र. मग वकीलाची मात्रा चालणं शक्य नव्हती. मी मालकीच्या मगरूरीनं म्हादबाला जायला सांगितलं. पांढरे केस झालेला तो बुढ्ढा पांढरे डोळे करतो कीं काय ह्या भीतीनं त्याच्याकडे पाहिलं तों काय ?

—म्हाताऱ्यानं सुलूचा पदर धरलेला दिसला.

म्हादबा धांवला.

म्हातारा पडला.

वकील नि मी टेबलाखालीं लपलों म्हणूनच—

पण काय रे सदानंद हें – हें – असलं वागणं भाऊसाहेबाला शोभलं कां ?

*　　*　　*

आनंदा – काय केलंस हें ? अरे ! मी सांगितलं काय नि तुम्हीं लोक करतां काय ?

पण नाहीं 'सुलू' म्हणते तेंच बरोबर. माझंच चुकलं. आनंदा – नका रे दारू पिऊं !

कालच तो बावचळलेला बॅरिस्टर बहकला म्हणून म्हादबा सांगत होता. आपल्या सुलूताईवरला प्रसंग तर म्हादबामुळंच निभावला. साठ पावसाळे पिऊनहि ज्या म्हाताऱ्याची कामतृष्णा शांत झाली नाहीं – ज्याची नीति दारूच्या एका पेल्यानं पार मातींत मिळवली – ती माणुसकीला मारणारी – अब्रूला आग लावणारी नि नीतीला नांगरणारी – दारू – नको – तो प्रसंग आठवायलाहि नको अन् दारूचं नांवहि नको.

आपण सगळे दारूबंदी करतां कॉंग्रेसला मदत करूं नि आपल्या वांट्याला आलेल्या हिणकस जीवनावरील बंदी उठवायला लावूं.

कोण म्हणतंय बाहेर गाणं—

सुलूचाच आवाज........

काय ? 'हांसत नाचत जाऊं'............

सुलू..................! ! !

—श्रीनिवास शंकर पेंडसे.

( उमरावती )

# ५

## दारूनें घेतलेले बळी !

आणखी किती वेळ मी तिच्यापुढें गात बसलों असतो कुणास ठाऊक ? पण ती फाटकाकडे टक लावून पाहूं लागल्यामुळें मी भानावर आलों !

दारांत एक विचित्र गृहस्थ उभा होता. मूळचा गौरवर्ण असून देखील त्याच्या चेहऱ्यावर प्रेताची अवकळा पसरली होती. उन्हानें त्याचा चेहरा काळवंडला होता. दाढीचें जंगल त्याला भेडसावीत होतें. ठिगळें जोडलेला एक फाटका सदरा व गांठी मारलेला एक मळकट पंचा त्याच्या अंगावर होता. हालचालीवरून तो एक माथेफिरू असावा असें उघड दिसत होतें !

" अवतार तरी पहा गुलामाचा ? " तिनें हंसत हंसत मला म्हटलें.

कुतूहलानें किंबहुना सखेद आश्चर्यानें मी त्याच्याकडे पाहिलें.

कितीतरी स्मृति-पट माझ्या अंतःचक्षूसमोरून सरकूं लागले!

*　　*　　*

शेजारच्या पाटलांची सुशीला माझी बाळपणची मैत्रीण. आम्हीं एकाच ठिकाणीं हंसलोंखेळलों होतों. सुशीला देखणी होती, मोहक होती. इतकेंच काय पण नांवाप्रमाणेंच ती सुशीलहि होती! आणि म्हणूनच ती मला फार आवडत होती. जसजशी ती मोठी होऊं लागली तसतसें तिला घराबाहेरील जग पारखें होऊं लागलें. सुशीला सदोदित मजजवळ असावी अशी माझी फार मनीषा होती. परंतु माझी गरीबी माझ्या इच्छेआड आली. हिंदुसंस्कारांत वाढलेल्या सुशीलेला आपल्या आईबापांच्या मनाविरुद्ध जातां येईना. अखेरीस तिचा विवाह वसंत मराठे या श्रीमंत गृहस्थाशीं मोठ्या थाटानें साजरा झाला!

वसंत हा आईबापाचा एकुलता एक मुलगा असलेनें फारच लाडांत वाढला होता. त्यामुळें त्याला व्हर्न्याक्युलर फायनलचाहि पल्ला गांठतां आला नाहीं. नेहमीं तो ऐषआरामांत निमग्न असे. मालकीच्या सराफी दुकानाकडे त्यानें ढुंकूनहि कधीं पाहिलें नव्हतें. आईबाप जिवंत होते तोंपर्यंत त्याला कशाचीहि कमतरता पडली नव्हती. परंतु लग्नानंतर दोनच वर्षांनीं त्याचे आईबाप प्लेगास बळी पडले. आणि प्रपंचाचा सर्व भार वसंताच्या शिरावर पडला. रंगेल वसंतास व्यवहार साधता आला नाहीं. कितीतरी स्वार्थसाधू

लोकांनीं त्याच्या भोळ्याभाबड्या स्वभावाचा फायदा करून घेतला.

वसंताचे वडील होते तोंपर्यंत दुकानहि छान चाललें होतें. वडील वारल्यानंतर दोनच वर्षांनीं दुकानचें दिवाळें वाजलें. दुकानच्या चालकांनीं, दुकानांतून खोऱ्यासारखा पैसा ओढून घेऊन स्वतःची स्थावर इस्टेट केली; आणि वसंत मात्र अल्पावधींत बेकार बनला. त्याचें जीवन नीरस झालें! दुकानाकडे दुर्लक्ष करण्याचें दुसरें महत्त्वाचें कारण म्हणजे दारू!! गडकऱ्याच्या 'एकच प्याला' नाटकाप्रमाणें वसंताला एक जबरदस्त 'तळीराम' भेटला होता; परंतु हा 'तळीराम' दारुडा नसून पक्का कपटी होता! त्यानें वसंताला दारूच्या नादीं लावून त्याला पुरतें लुबाडलें होतें! व त्यास बेकारीच्या झळा लागूं लागल्यानंतर हा बदमाष तळीराम नामानिराळा झाला होता. यावेळीं वसंताचा वेष पाहण्याजोगा होता!

अशा रीतीनें वसंत शनीच्या फेऱ्यांत पुरा सांपडला! घर गेलें, दुकान गेलें! घरांतील दागदागिने, चांगल्या चांगल्या चीजवस्तु गहाण पडल्या आणि वसंताच्या हातांत फक्त दारूची बाटली आली!

बिचारी सुशीला! लग्नापूर्वीं रचलेले तिचे कल्पनेचे मनोरे अवघ्या चार वर्षांच्या आंत पार ढासळून गेले. पोत्यानें दान करणारी सुशीला आज मूठभर दाण्यास महाग झाली होती. असल्या संकटासहि ती बिलकुल डगमगली नसती. परंतु वसंतास दारूचा नाद

लागला आहे, हें जेव्हां तिला समजलें तेव्हां तिला एकदम आकाश कोसळल्यासारखें झालें. तेव्हांपासून काळजीनें तिचें शरीर कोळपून जाऊं लागलें. रात्रंदिवस तिच्या डोळ्यांतील पावसाच्या सरी ओसल्या नाहींत ! तळहातांतील फोडाप्रमाणें तिचें संरक्षण करणारा वसंत आज तिला उठल्याबसल्या लाथा घालीत असे ! आणि हें सर्व, पतीला देव मानणारी सुशीला निमुटपणें गोगलगाईवत् सहन करीत असे !

सुशीला एकदां तापानें आजारी होती. त्यावेळीं प्रेमळ वसंतानें तिची एखाद्या कुशल नर्सप्रमाणें शुश्रूषा केली होती ! इतकें त्याचें तिच्यावर अतोनात प्रेम होतें ! पण हा त्याचा प्रेमळपणा दारूच्या प्याल्यांत जाऊन दडून बसला होता.

याहिपेक्षां अनेक रोमांचकारी प्रसंग आठवून सुशीलेला अतोनात दुःख होऊं लागलें. तरीपण तिच्या कुडींतला प्राण, हृदयाचा विसांवा व सुखाचा आसरा दोन वर्षांचा चिमणा राजा मधुकर तिला दिसत होता. आणि त्याच्या आशेवरच ती आपली जीवित — नौका कशीतरी हांकूं लागली. वसंताला मात्र दारूच्या प्याल्याशिवाय दुसरें जग दिसत नव्हतें. त्यानें आपली माणुसकी दारूच्या दुकानांत गहाण टाकली होती.

एकदां सुशीला मधुकरास मांडीवर घेऊन त्याचें कोडकौतुक करीत बसली होती. मधुकराच्या मधुर मुखांतील मधू सेवन करण्यांत

ती इतकी दंग होऊन गेली होती कीं, तिला बाहेरील जगाचा पूर्ण विसर पडला होता !

पण दैवाला तिचें एवढेंहि सुख पाहवलें नाहीं !

" सुशे ऽ, निर्लज्ज ! मला पैसे हवेत, पोराला काय पाजतेस ? " वसंत कडाडला.

सुशीलेला एकदम धरणीकंपाचा धक्का बसला ! बाळ मधुकरहि मातेच्या स्तनापासून एकदम दूर झाला !

" हं ऽ पैसे देतीस कीं नाहीं ऽऽ ? " पुन्हा वीज कडाडली.

" असं काय बोलायचं तें ! कुठलें आणूं पैसे ? " सुशीला नम्रतेनें बोलली.

" मध्याला गहाण ठेव नि पैसे आण ! " बाप बोलला. हें ऐकतांच सुशीलेच्या अंतःकरणाचें पाणी पाणी झालें ! तिचें काळीज तिळतिळ तुटलें ! असलें अभद्र बोलणें ऐकून कुठल्या सहृदय मातेच्या डोळ्यांतून आसवांचीं मौक्तिकें गळणार नाहींत ?

पण उत्तरास प्रत्युत्तर देण्याला ती कांहीं ' कुंकू ' बोलपटांतील ' नीरा ' नव्हती ! तर ती गडकऱ्याच्या ' एकच प्याला ' नाटकांतील साधीसुधी ' सिंधू ' होती.

" असं काऽय करायचं ? " लीनपणें सुशीला बोलली. पण उत्तरादाखल दारुड्या वसंतानें प्रथम सुशीलेच्या आईबहिणींचा उद्धार केला ! आणि नंतर तिच्या कमरेवर दोन लाथा हसडून

मारल्या ! बिचारी बाळबोध वर्णाची सुशीला — स्त्रीजातींत जन्म घेऊन भयंकर गुन्हा केलेली सुशीला — पति हेंच दैवत मानणारी सुशीला कोलमडून धाडकन् जमिनीवर पडली. आणि बाळ मधुकर मातेपासून दूर फेंकला जाऊन बेशुद्ध पडला !

—नादान नवऱ्यानें बाहेरची वाट धरिली !

बऱ्याच वेळानें सुशीला भानावर आली. तिचा चिमुकला राजसराणा मूर्च्छित पडला होता. पदरानें वारा घालून ताबडतोब तिनें त्यास सावध केलें. आणि कितीतरी वेळ त्याला घट्ट पोटाशीं धरिलें. तिच्या नेत्रांतील उष्ण अश्रूबिंदू त्याच्या पाठीवर पडत होते !

पण मधुकराला कवटाळून जर पोटाचा प्रश्न सुटला असतां तर तिनें त्याला अहोरात्र हृदयाशीं धरलें असतें. आणि त्यापुढें तिनें स्वर्ग-सौख्यहि तुच्छ लेखिलें असतें. परंतु मधुच्या दुधासाठीं आणि नादान पतीच्या मदिरा—सवतीसाठीं तिला कुठंतरी उद्योगधंदा करणं भाग होतं !

अखेरीस जेठीराम शेटजीच्या तंबाकूच्या वखारींत दररोज आठ आणे मजुरीनें कामाला जाण्याचा तिनें निश्चय केला. शेजारच्या मंजुळेनें हा सौदा पटवून दिला. वसंतानेंहि निर्लज्जपणानें संमती दिली. आणि पापी लोकांच्या नजरेस जिचें नखहि दृष्टीस पडणार नाहीं अशी सुशीला लोकांच्या टवाळ्या निमुटपणें सहन करून

तंबाकूच्या वखारींत दररोज जाऊं लागली !

पहिल्यांदा तिला वखारींतील अलबत्या गलबत्या माणसांकडून बराच उपसर्ग पोहोंचला. एकदां तर त्या वखारींतील मुख्य कारकुनानें तिच्या पावित्र्यावर घाला घालण्याचा व्यूह रचला होता. परंतु शेटजीनीं तिला त्या प्रसंगांतून सोडविलें, आणि त्या कारकुनास कामावरून कायमचें बडतर्फ केलें.

साहजिकच शेटजीबद्दल तिला फार आदर वाटूं लागला. तशांत शेटजीनें तिचा पगार वाढविल्यामुळें तो आदर अधिकच दुणावला. परंतु त्या मुरब्बी पारध्याची या गरीब हरिणीला आतांच कुठली कल्पना येणार ? शेटजीनें आपलें मोहक जाळें हळूच तिच्याभोंवतीं पसरण्यास सुरवात केली होती. तो शेटजी दयेचा सागर नसून खाणींतील काळा फत्तर होता !

दिवाळीचा सण जवळ आला होता. शहरांत रोषनाई सुरूं होती. जिकडे तिकडे आनंदाचें साम्राज्य पसरलें होतें. पण सुशीलेच्या पुढें मात्र दुःखाचा पर्वत उभा होता ! तिला आपलें बालपण आठवलें ! लग्नापूर्वींची दिवाळी आठवली ! पण कुशींत मान घालून हुंदके देण्यापलीकडे तिच्या हातांत दुसरें काय होतें ? पगाराचा पैसा नवऱ्याच्या दारूंत व प्रपंचाची कशीतरी गुजराण करण्यांत संपत असे.

“ पण शेटजीकडून पांच रुपये उसने मागून घेतले तर ? ”

तिनें स्वतःशीं प्रश्न केला.

" शेटजी फार दयाळू आहे; तो दहा रुपये सुद्धां देईल. आणि मग माझ्या मधुकराची दिवाळी साजरी होईल ! "

तिला उत्तर मिळालें.

शेटजीकडे जाऊन लगेच तिनें पैशाची मागणी केली व शेटजीनें तिच्या कल्पनेप्रमाणें दहा रुपये देण्याचें आश्वासन दिलें. त्यानें तिला पैसे नेण्याकरितां वखारींत बोलावलें होतें.

त्या दिवशीं बाजार असल्यानें मजूर लोकांना सुटी होती. मधूला घरीं झोपवून झप्झप् पावलें टाकीत ती वखारींत गेली. वखारींत चिट्पांखरूं नव्हतें ! शेटजी मात्र एका पलंगावर बसले होते. तांबूल खाऊन त्यांचे ओठ लाल झाले होते. चेहरा सुप्रसन्न दिसत होता. सुशीला आंत आल्यावर शेटजीनें तिचें स्वागत करून तिला जवळच एका आसनावर बसावयास सांगितलें. शेटजीचा तो विशाल देह, एकांतवास वगैरे पाहून प्रथम तिला कसेसेंच वाटलें; पण लागलीच दोनतीन नोकर तेथें आल्यानें तिला धीर आला. परंतु त्या नोकरांनीं एकदम सर्व दारांस कड्या ठोकून तेथून सर्वांनीं पोबारा केला !

आतां मात्र सुशीलेनें शेटजीचा अंतरंग ओळखला ! ती भीतीनें थरथर कांपूं लागली ! अंगावरून घामाच्या धारा वाहूं लागल्या ! असल्या लाजिरवाण्या कृत्यापासून अलिप्त राहण्याबद्दल तिनें त्यास परोपरीनें विनवून पाहिलें ! त्याची करुणा भाकली—हात जोडले—

पदर पसरला ! जें कांहीं शक्य होतें तें सर्व सुशीलेनें केलें; परंतु त्या नीच मांगाला थोडीसुद्धां दया आली नाहीं. कामांध माणसाला जिथें प्रत्यक्ष जिवाची पर्वा असत नाहीं तिथें एका गरीब अबलेची काय कथा ?

" तुझ्यासारखं गुलजार मोहक पांखरूं आयतं पिंजऱ्यांत येऊन सांपडल्यावर त्याला सोडून देण्याइतका मी कांहीं मूर्ख नाहीं ? मुकाट्यानं कबूल हो ! ब्रम्हदेवाच्या बापालाहि तुझी आतां सुटका करतां येणार नाहीं." त्यानें उर्मटपणें उत्तर दिलें.

तिनें पुष्कळ आढेवेढे घेतले, परंतु आतां त्याचा कांहींहि उपयोग नव्हता. कसाबाच्या हातांत गाय सांपडली होती ! सुरा पाजळून तयार होता !

गाईनें हंबरडा फोडला ! पण तो कुणाला ऐकूं जाणार ? सगळें जग त्यावेळीं निश्चल झालें होतें ! हां हां म्हणतां त्या कसाबानें त्या गरीब गाईवर चाल केली ! त्या उलट्या काळजाच्या मांगानें दीन-दुबळ्या सुशीलेचा शीलभंग केला ! तिचें पातिव्रत्य नष्ट झालें !

ही सर्व विटंबना सहन करून सुशीला एका कोपऱ्यांत मूग गिळून पुतळ्याप्रमाणें निश्चल पडली होती ! तिचे डोळे रागानें लाल झाले होते ! सर्वांग भिजून चिंब झालें होतें ! पृथ्वी मोलाचें माणिक-मोतीं तिच्या नेत्रांतून बाहेर पडत होते !

आणि तो बेडर वृत्तीचा पाषाणहृदयी मांग पलंगावर बेदरकारपणें

पडला होता !

परंतु पापाचा घडा केव्हांहि भरतोच ! ‘ जशास तसें ’ हा जगाचा नियम आहे ! सगळ्यांनींच कांहीं माणुसकी विकलेली नसते ! प्रसंगीं फत्तरासहि पाझर फुटतो.

बाहेर असलेल्या नोकरांनीं झालेला प्रकार अवलोकन केला. साध्वीचा हंबरडा त्यांना ऐकूं गेला ! साध्वीचा शाप त्यांना झोंबूं लागला ! त्यांची विवेकबुद्धि एकदम जागृत झाली ! तीरासारखे धांवत जाऊन त्यांनीं त्या कसाबाचा सुशीलेसमक्ष खून केला ! व एकानें तिला सुरक्षित घरीं पोहोंचविली !

रीतसर प्रेताचा पंचनामा होऊन त्या तिघां नोकरांवर खटला भरला गेला ! त्यांनीं झालेला सर्व वृत्तांत न्यायाधीशापुढें निवेदन केला ! न्यायाधीशांना सुशीलेची गरज अर्थांतच भासली. पण....पण काय सुशीला हें पापी जग सोडून केव्हांच गेली होती !

मधुकराला पोटाशीं बांधून घेऊन, तिनें आपल्या रहत्या घराच्या परसांतील विहीरींत उडी टाकून केव्हांच आत्महत्या करून घेतली होती ! !

बिचारा दारूडा वसंत ! त्याच्या डोळ्यांतील धुंदी पार नाहींशी झाली होती ! त्याला आतां पूर्ण पश्चात्ताप झाला होता ! पण सुकलेली वेल आंसवांनीं थोडीच फुलणार ?

कुठल्याहि माणसाच्या गुणाची किंमत त्याच्या मृत्यूनंतरच

कळत असते ! याला वसंत तरी कसा अपवाद ठरणार ? त्याची मदिरा—राक्षसीण त्याला सोडून केव्हांच पसार झाली होती ! याहि स्थितींत त्याच्याजवळ राहण्याइतकी कां ती मूर्ख होती ? मग तिचें महात्म्य काय राहिलें असतें ?

वसंतास आपलें गतायुष्य सारखें आठवत होतें ! त्याची माणुसकी त्यास परत मिळाली होती ! सुशीलेची ती प्रेमळ नि सहनशील मूर्ति त्याच्या मनःचक्षूसमोरून हालत नव्हती ! पण क्षणभरच !

वसंतानें एकदम जोरानें टाळी वाजविली आणि हंसत हंसत सुशीला—सुशीला म्हणून ओरडत तो गांवांतून पळत सुटला ! त्याला आतां वेड लागलें होतें !

* * *

मध्यंतरीं चारपांच वर्षे वसंताचा मागमूसहि नव्हता. परंतु आज तो अचानक माझ्या नजरेसमोर आल्यानें मला चट्कन् त्याचा आयुष्य-पट दिसला आणि माझे डोळे पाणावले.

—बंडोपंत सखाराम भोसले [ सुरेशबाबू ]
( कोल्हापूर )



# ६

## अंजन

मुरगांवला ‘ रॅली शिप एजन्सीं ’ त विठूला दरमहा वीस रुपयांची नोकरी, गोकुळेसारखी सुग्रण बायको अन् चार सोन्यासारखीं पोरं.

त्याचं जीवन कितीतरी सुखकर व्हायला हवं होतं.

पण नव्हतं !

त्याला दारूचा नाद होता.

नदीचा ओघ उलटा वळविणं नि एखाद्याला त्याच्या व्यसनापासून परावृत्त करणं हीं दोन्ही तेवढींच अवघड.

गोकुळेनं तें सोडविण्यासाठीं खूप आदळआपट केली. ती रुसली, फुगली, रडली; सारं कांहीं केलंन – पण पालथ्या घागरीवर पाणी !

जेवण झाल्यावर रात्रीं नऊ वाजतां विठू बाहेर पडायचा. घरांतून

आणि रस्त्याच्या कोपऱ्यावर असलेल्या ख्रिस्तावच्या ‘ नवो पंजिम-बारां ’ त जाऊन बाटल्या झोकायचा.

त्याला केव्हां केव्हां दोनतीनचा सुमार व्हायचा घरीं यायला. रात्रीं दुर्गन्धीनं घाणत तो झुकांड्या देत आला कीं गोकुळेला शिसारी यायची त्याची !

आज तो असाच ‘ बार ’ मधून झिंगून बाहेर पडला. आपण कुठं चाललों आहोंत हें त्याचं त्याला माहित नव्हतं — शुद्धबुद्ध असली तर समजणार ना ?

विरल कापसाचा पुंजका हवेंत वर तरळत असतो. जातो कां तो कधीं एका दिशेनं ? जिकडून वारा सुटेल ती त्याची वाट. सुकाणुं-विना नावच जणूं. तशी गत. विठू वाट फुटेल तिकडे निघाला होता. त्याचे पाय त्याला नकळत बाजूच्या वाळवंटाकडं वळले.

ती अवसेची गडद रात्र !

मुरगांव बंदरावरचा दीपगृह विझून पुन्हां कांहीं क्षणांनीं पेटत होता. जणूं काय मरणाच्या दारीं पडलेला जीवात्मा मृत्युशीं अखे-रची धडपड करीत होता !

वाळवंटाच्या दुसऱ्या टोंकाला कोळी कसलेंतरी कोंकणी गाणें भसाड्या आवाजांत गात रांपण ओढीत होते.

गाणें कसलें ! —

ऐकणाऱ्याला कण्हणंच वाटायच तें.

विठू तसाच लटपटत वाळवंटावर आला. रेतींत पाय घुसत असल्यानं त्याला धड नीट चालतांहि येत नव्हतं. मधेंच त्याचे पाय एकमेकांत अडकून तो धप्‌कन खालीं आपटला वाळूवर. सुंद होऊन त्या बेभानवस्थेंत तो कितीतरी वेळ पडला होता!

दोनतीन तासांनीं जेव्हां त्याला जाग आली तेव्हां तो पूर्ण शुद्धीवर आला. त्यानं अंगाला आळेपिळे दिले नि आपल्या दोन्ही हातांचे तळवे डोळ्यांवरून एकदां जोरानं घासले. आपण ' बार ' मधून झिंगत झिंगत इकडं येऊन पडलों हें त्याला स्वतः समजायला वेळ लागला नाहीं.

रोज रात्रीं धुन्दी उतरून तो शुद्धीवर आला कीं, या निशाचरी वृत्तीबद्दल त्याची त्यालाच लाज वाटायची अगदीं! आणि मनांत उपरती होऊन उद्यांपासून ' बार ' कडं फिरकायचं नाहीं — नव्हे घरांतून मुळीं बाहेरच पडायचं नाहीं, अशी खूणगांठ आपल्या मनाशीं तो बांधी.

पण दुसऱ्या दिवशीं जेवण होऊन हातावर पाणी पडलं कीं आदल्या दिवशीं केलेल्या निश्चयाचा मागमूससुद्धां मनांत न आणतां तो ' बार ' कडं जायचा.

त्याप्रमाणं आजहि त्यानं निश्चय केला.

पण तेवढ्यांत आपल्यापुढून कुणीतरी गेल्यासारखा त्याला भास झाला!

त्यानं चटकन् उठून अंधेरांत निरखून पाहिले.

एक बाई झप्झप् पावलें टाकीत किनाऱ्याकडं चाललेली दिसली!

विठूला आश्चर्य वाटलें!

अशा मध्यरात्रीं ही बाई वाळवंटावर कां आलीय? जीवाचं बरंवाईट तर करून घेणार नसेल ना?

या विचारानं त्याच्या अंगावर शहारे आले. माणसाचं मन जात्याच कनवाळू नि सहानुभूतिपूर्ण असतें कीं काय कोण जाणे? विठूला आपल्या विकल मनःस्थितीचा घटकाभर विसर पडला आणि त्या बाईविषयीं पराकाष्ठेची आत्मीयता वाटूं लागली.

तो तिच्या मागून गेला.

तिनं लुगड्याचा काचा गुडघ्यावर मारला होता. पाठीवरचा लांब पदर ती कमरेला लपेटत होती. जगणं कीं मरणं या लढ्यांत तिच्या मनाची रस्सी-खेच चालली होती! एक क्षणभर केविलवाण्या नजरेनं ती वळून मागच्या नारळीकडं पाहून दीर्घ उसासे सोडायची. तर दुसऱ्या क्षणीं मन घट्ट करून समोरच्या अफाट सागराकडं पाहायची. शेवटीं तिनं धैर्य नि बळ एकवटून मनाचा निर्धार केला.

ती पाण्यांत उडी टाकणार—

तों नारळीच्या बाजूनं एका पोराच्या किंकाळ्या आल्या—

'आई ग....आई. कुठ गेलीस तूं! मला बाबा किती मारताहेत'. 'ती येतीय् छिनाल् आतां. मेली असेल एव्हांना दर्यांत पडून'—एका

माणसाचे कठोर स्वर दुमदुमले.

पुन्हां कशानं तरी ‘ सप्कन् ’ मारल्याचा आवाज आला ! अन् ते पोर किंचाळूं लागलें.

आईचं हृदय विरघळलं !

तशीच धांवत धांवत ती नारळीच्या रोंखानं निघाली. विठू तिच्या मागोमाग गेला.

नारळीखालच्या खोपटासमोर ती बाई आल्यावर एका उघड्या-नागड्या पोरानं ‘ आई ’ म्हणत तिच्यावर झेंप टाकली.

‘ आई तूं मला सोडून जाणार – नको ग जाऊं ! ’

‘ नाहीं, नाहीं आतां मी कुठं कुठं जायची नाहीं बाळाला सोडून. ’

ती मायलेंकरूं एकमेकांना कवटाळून रडूं लागली.

बाजूला झिंगून पडलेला एक माणूस – तिचा नवरा पुन्हां हातांत वेळवाची काठी घेऊन उठला आणि ‘ जीव देते म्हणे जीव ’ असं बडबडत हातांतल्या काठीनं तो दोघांनाहि झोडपूं लागला.

प्रत्येक मारागणीक ती मायलेंकरूं ‘ आई ’, ‘ बाळ ’ अशी एक-मेकांला साद देत होती.

नारळीच्या आड राहून विठू हें सारं पाहात होता.

आपण सुंदर आहोंत कीं कुरूप आहोंत हें आरशांत पाहिल्या-शिवाय नाहीं समजत; आरसाच खरंखुरं प्रतिबिंब दाखवितो.

तें दृश्य विठूला आपल्या जीवनाच्या प्रतिबिंबाप्रमाणेंच दिसलें !

आपण घरीं असेंच झिंगून गेलों आहे; तो रुद्रावतार पाहून सारीं पोरं गोकुळेला बिलगलीं आहेत अन् आपण मुलांसकट गोकुळेला झोडपतों आहे !

त्याच्या डोळ्यांला अंधारी आली. तो वेदनातिशयानं विव्हळूं लागला; त्या दारूड्या नवऱ्याचे फटकारे जणूं काय विठूच्या अंगावर बसत होते.

अपराधी मन किती अदु होतं क्षणांत ! एरव्हीं हाच विठू बंदरावर ओझीवाल्याकडून कामं करून घेतांना कृतांत काळ वाटायचा अगदीं.

तेवढ्यांत विठूच्या मनांत किती भयंकर विचार आले एकदम !....

गोकुळेनं पण हिच्याप्रमाणं जिवाचं बरंवाईट करून तर घेतलं नसेल ना ?

तो तसाच रस्त्यांतून धांवत धांवत घराकडं चालला. घर जवळ येईतोंपर्यंत त्या विचाराचं भूत त्याच्या मनांत थैमान घालीत होतं. भीत भीत त्यानं घराचं दार लोटलं.

आंत सारा गडद अंधार. नाहीं म्हणायला रस्त्यावरच्या दिव्याचा दारांतून गेलेला उजेडच काय तो.

तो आंत गेला.

त्याचीं पोरं फाटक्या–तुटक्या तरटावर शांतपणं घोरत होतीं.

पोरांच्या घोळक्यांत गोकुळा गुडघ्यांत तोंड खुपसून गदमदून रडत होती.

गोकुळेला पाहून त्याच्या जिवावरचं ओझं किती कमी झालं!

'गोकुळे, गोकुळे' असं म्हणत विठूनं तिला मिठी मारली. ती इतकी लगबगीनं कीं जणूं कांहीं कुणी तरी गोकुळेला त्याच्यापासून हिसकून नेत होतं!

नवऱ्याच्या या वागणुकीनं अनपेक्षित आश्चर्य वाटलं गोकुळेला.

विठूनं तिला जास्त जोरानं कवटाळलं अन् तो म्हणाला, 'गोकुळे, आजपासून मी दारू सोडली.'

'आपण स्वप्नांत तर नाहीं'—गोकुळेनं अंगाला चिमटा काढून खातरी करून घेतली. तिला नवऱ्याचं बोलणं ऐकूं आलं तरी तिला न ऐकूं आल्यासारखं वाटलं!

'खरंच! खरंच दारू सोडली?'

'होय, तुझी अन् पोरांच्या गळ्याची शपथ घेतों हवी तर.'

× × ×

'माझं एक कायमचं गिऱ्हाईक येईनास झालंय्. कुणी लुबाडलंय् कोण जाणे—' बारवाला आलेल्या गिऱ्हाइकाशीं असं कांहींतरी कुरकुरत असतो म्हणे नेहमीं!

— भि. रा. पुराणिक.

(जमखंडी)



# ‘दारू पीना हराम है !’

‘आतां कां बोंबयावं बिंबवाव कां काय? भाकय बी न्हाय टोपयांत—’ लहानगा पांच वर्षांचा भिमराव भाकरीच्या टोपल्यांत भाकरी न दिसल्यामुळें त्राग्यानें उद्गारला व त्यानें ‘आई मया भाकऽऽय’ म्हणून मोठ्यानें रडण्यास सुरवात केली.

‘कार्ट्या, पोटांत आग पडली काय इतक्या रामपाऱ्यांत?’

आईनें एक त्याला शिवी भडकाविली. पण भिमरावानें उच्चारलेल्या पहिल्या बोबड्या वाक्यानें त्या माऊलीच्या चेहेऱ्यावर कौतुकाची छटा उमटल्याशिवाय राहिली नाहीं.

‘आई दी कीं मया भाकऽऽय’ भिमरावचें रडणें चालूच होतें.
‘तीऽऽघी त्या भगुल्याखालची !’ आईनें पातेल्याकडे हात करीत म्हटलें.

‘नग मला असली कायी जाऽऽ’ पातेल्याखालच्या भाकरीकडे

पहात मोठ्यानें रडत भिमराव म्हणाला. ‘ मला पांढयी पाहिजेय् कायच्यावनीं ! ’

‘ खातुस का नाहीं रं मुकाट्या ! ’ आई जोरानें ओरडली. ‘ कां घालं पाटींत एक........मिळाली कां न्हाय आतां ? त्यानं चाललंय् काळी न् पांढरी !.... किती नखरा करशील रं.... म्हणं मला पांढरी भाकरी पाहिजेय् ? तुझ्या बानं कुठं आणलया जुंधळ तवा घालूं करून तुला पांढऱ्या भाकरी....’

तडातडा बोलण्याचें कार्य भिमरावच्या आईनें चालविलें होतें. पण भिमराव कशाला पडतो आहे ते ऐकण्याच्या भानगडींत. त्यानें आपली ती ‘ काळी भाकरी ’ घेतली आणि मारे दांतानें कुरतडून खाण्याचा सपाटा चालविला.

सूर्याचे कोंवळे किरण रस्त्यावर पडले होते. आकाश निरभ्र होते. पावसाची वाट पाहून पाहून शेतकऱ्यांचे डोळे पांढरे झाले होते. यंदा कोरडा दुष्काळ पडण्याच्या बेतांत होता. रोज बारा तास खपण्याची तयारी असूनहि एक आणा मिळण्याची मारामार पडत होती. बहुतेक शेतकऱ्यांची स्थिति अक्षरशः अन्नान्न झाली होती. कोणी मटकीच्या, तर कोणी हुलग्याच्या, तर कोणी हरभऱ्याच्या भाकरी खाऊन कसातरी रोज घालवीत होते. जोंधळ्याच्या भाकरी खावयास मिळणारीं कुटुंबें शंभरांत पांचहि असतील नसतील. अर्थात् आमच्या भिमरावच्या घरीं कुठली आली जोंधळ्याची भाकरी !

कालच त्याच्या आण्णानें—शंकरनें—काकांच्या घरून येतांना धोतराच्या पदरांत एक चतकोर भाकरीचा तुकडा आणला होता म्हणून भिमरावला खायला मिळाला. पण रोज कुठून मिळणार त्याला तो !

भाकरी खाण्याच्या भरांत आण्णा केव्हां आला हें भिमरावला कळलेंहि नाहीं.

'आज लवकर आलास बाळ?' आईनें मात्र शंकरला तो लवकर आल्याचें पाहून विचारलें.

शंकर स्तब्धच उभा राहिला.

आईच्या काळजांत चर्रर्र झालें.

शंकरनें उदास चेहऱ्यानें आईकडे पाहिलें. हताश झाल्यामुळें त्याच्या हातांतील फाटकें धोतर आपोआप गळून खालीं जमिनीवर पडलें. काय बोलावें हें त्याला सुचेना. अंतःकरणांतील भावना बोलून दाखवतां न आल्यामुळें त्या सहजगत्या डोळ्यांतून अश्रूरूपानें बाहेर पडूं लागल्या.

पटकन् आईनें त्याला पोटाशीं धरलें. हृदयाला हृदय भिडलें. शंकर मोठ्यानें रडूं लागला. 'आई मी न्हाय जात आज कामावर !' हुंदके देत तो बोलण्याचा प्रयत्न करूं लागला. पण शब्दाऐवजीं रडण्याचा आवाज मात्र मोठा होऊं लागला. तोंच—

'आरं गप्प मारुती झोंपलाय !' आई शंकरला दाबीत म्हणाली. 'त्याला आज आठ दिस झालं आफू नाहीं बघ. रातपसनं

त्यानं रडून रडून आक्सी भंडावून सोडलं हुत मला. आतांच कुठ डोळा लागलाय त्याचा !....'

'दादा कुठाय ?' जिव्हाळ्याच्या विषयावरून दुसरीकडे लक्ष वेधण्याच्या हेतूनें शंकर बोलला.

'गेल्यात सद्याला घिऊन पाटलाच्या शेतांत !'

'बोलिवलं हुतं काय पाटलानं ?' शंकरनें विचारलें.

'महिन्या रुपायावर कां काय ठिवतुं आसं म्हणलाय जणूं बाबा पाटील !' आईनें उत्तर दिलें.

'महिन्या रुपायाच !' शंकरनें विचारलें 'कोरडा कां वला गं आई पन ?'

'दोन वक्ताला दीन म्हणलाय म्हणं जेवायला मग कुणाला ठावं ?' आई म्हणाली. 'पण रातचं मळ्यांत राखाण राह्यची बोली हाय म्हण बाबा !' आई घाबरत घाबरत म्हणाली.

'असाना कां ?' शंकर आईचें समाधान करीत म्हणाला. 'हायती माळ्याची माणसं शेजारी, काय भ्या नाय त्याला रातचं !'

'पण त्या पाटलाची आई लय खराब हाय म्हणं रं ?' आईनें विचारलें.

'आगं ती आमच्या त्या × × काकापरीस लय बरी !' शंकर रागानें बोलूं लागला. काकाची त्याला भयंकर चीड आल्याचें दिसलें. त्याच्या कपाळावरील शिरा ताठ उभ्या राहिल्या. भर

जवानींत नुकतांच येऊं लागलेला त्याचा चेहरा जास्तच आरक्त दिसूं लागला. ‘ एखाद्या म्हाराची चाकरी बरी पण या काकाचं दर्शन नकुं वाटतं. समद्या दिवसभर हाताला दम न्हाय. रानांत काम घरीं काम ! आन् इतकं करून पोटाला भाकर बी पुरती देत न्हाय. ती काकी तर भाकर खातांना, ऊगं टवकारून बघत आसती माझ्याकडं. एक दिस काय माऊलीनं मला ताजी भाकर न्हाय गं दिली आई, ह्यो सूर्या नारायण हाय साक्षी मी तिच्यावर आळ घेत असलुं तर ! .... आन् काम तर काय बी सांगत्यातीय् ! दिवाणखानाच झाड ! आंगानच झाड ! बरं पण त्ये एक असूं ! पण त्यानं काय मला पायखान्यांत पाणी बी न्यायला सांगावं हुयं आई ? असा राग आला मला काल त्याचा .... ’

‘ राग येऊन कसं भागल बाळ ! ’ आई काकुळतीनं त्याला म्हणाली. ‘ कोणचं बी काम केलं म्हंजी .... ’

‘ बास आई पुरी कर तुझं ! ’ मध्येंच शंकर म्हणाला. ‘ आपल्या बाच्यानं आसलं काम न्हाय व्हणार ! कुणी म्हणीना का माजला म्हणून ! .... ’

‘ आण्णा कवा आलास रं ’ असं म्हणत भिमराव इतक्यांत बाहेर आला व आपल्या आण्णाच्या गळ्याला बिलगला.

‘ मला भाकय आणयी काय कायच्यावानीं ! ’ मोठ्या लाडानें तो विचारूं लागला. ‘ यय यय ग्वॉड यागती बघ ती ! ’

शंकरनें त्याला आपल्या दोन्ही बाहूंत मोठ्या प्रेमानें घट्ट धरलें व त्याचे पटापट मुके घेण्यास सुरवात केली.

* * *

शंकरच्या मनांत आज आठ दिवस विचारांची मोठी खळबळ चाललेली दिसत होती. दिवसभर मरमरेतों अपमानास्पद रीतीनें काम करून मिळायचें काय ? तर फक्त एक शेर ज्वारी ! पण जिथें एक ज्वारीचा दाणा एक रुपया किंमतीचा झाला होता तिथें एक शेराची किंमत काय थोडी होणार ? दादा, सदाशिव व तो स्वतः अशा तिघांच्या पोटांची खळगी भरण्याचा प्रश्न कसातरी सुटला होता. आपली आई, भिमराव, मारूती यांच्यासाठीं त्याला काम करणें प्राप्त होतें. आई नुकतीच बाळंतीण झाल्यामुळें तिला काम करणें शक्य नव्हतें. आणि जरी मनाच्या हिंमतीवर काम करण्याची तयारी तिनें दर्शविली असती तरी तिला काम कुठें मिळणार होतें ?

दिवसामागून दिवस चालले होते. रात्रीमागून रात्र संपत होती. गरिबांचीं दुःखें सारखीं वाढत होतीं. जिवंतपणींच अहोरात्र भोगाव्या लागणाऱ्या नरकांतील भयंकर यातना असह्य झाल्यामुळें निघणाऱ्या हृदयभेदी किंकाळ्या फोडीत ते कसेंतरी जीवन कंठीत होते. ‘ परमेश्वरा सोडीव रे बाबा यांतून ! ’ अशी देवाची प्रार्थना दीनवाणीनें करण्याचा त्यांचा क्रम सुरूच होता. ‘ आम्ही मागच्या जल्मीं काय केलं म्हणून त्याची झडती घ्यायला निघालासरंय बाबा ’ असे पश्चा-

तापपूर्वक उद्गार हीनदीन झाल्यामुळें भांबावलेल्या मनःस्थितींतून त्यांच्याकडून निघत होते. त्यांना कळून येत नव्हतें कीं सर्व विश्वाचा देव आंधळा, बहिरा व मुका झालेला आहे.

असह्य दुःख सतत सहन करण्याचा प्रसंग आला तर मनुष्य त्यापासून तात्पुरती कां होईना पण सुटका करून घेण्याचा प्रयत्न करीत असतो. दुःख नाहींसें झालें नाहीं तरी निदान त्याचा विसर तरी पडावा – तात्पुरता कां होईना – अशी मनुष्याची इच्छा असते. त्याला शंकर तरी कसा अपवाद ठरणार ? आहे त्या परिस्थितींतून सुटका करून घेण्याचें त्यानें ठरविलें. प्राप्त परिस्थितींतून दूर दूर कोठेंतरी जावें असें त्याला वाटत होतें. राक्षसी अंतःकरणाच्या मालकाची त्याला किळस येऊं लागली होती. त्याच्या भाबड्या मनाला वाटलें कीं आपण येथून दूर कोठेंतरी गेलों तर अशा माणसांचा संपर्कहि आपणाला लागणार नाहीं. आपण या परिस्थितींतून पळून गेलों तर तिची भयंकर भेसूर मूर्ति आपणास बिलकूल भिवविणार नाहीं. आणि त्यानें निश्चय केला ' बस्स पुण्याला जायचें ! '

* * *

आठ दिवसांनंतरची गोष्ट ! सायंकाळीं पांचचा सुमार ! शंकर पुण्यांतील मंडईजवळ मोटारींतून उतरला होता. स्वतःचें गांव सोडून पुण्यासारख्या ठिकाणीं येण्याचा त्याचा पहिलाच प्रसंग !

अर्थातच नवीन वातावरणामुळें तो भांबावला ! त्या मोठमोठाल्या इमारती, ते मोटारींचे आवाज, तो तांग्याच्या घोड्यांच्या टापांचा टपटपाट, सायकलवाल्यांच्या घंटींचा घणघणाट, आणि हॉटेलांतून पोवाड्यासारख्या लावलेल्या फोनोंच्या प्लेटींचा दणदणाट ! साराच थाट कांहीं विशेष होता. तो पाहून त्याला आपल्या परिस्थितीचा पूर्ण विसर पडला. काकांच्या खिशांतून दोन रुपये चोरतांना त्याच्या हृदयाचा जो थरकांप उडाला होता, आई–भिमराव–मारुतीला सोडून जायचें या विचारानें त्याचें जें मन गांगरून गेलें होतें, मोटारींत बसून पुण्यास येईपर्यंत काका आपल्यामागें कोणी मनुष्य तर नाहींना पाठवावयाचे या विचारानें त्याला जी भीति वाटत होती, त्या सर्व गोष्टी पार नाहींशा झाल्या. नवीन विविध दृश्यांचें कुतूहलपूर्वक निरीक्षण करण्यांत तो पूर्णपणें गुंगून गेला होता.

थोडा वेळ तर त्याला आपण कोठें आहोंत हेंच समजेना. मात्र येथील लोक फार चांगले असावेत असें – कां कुणास ठाऊक – पण त्याला वाटूं लागलें. निदान अशा पांढऱ्या शुभ्र ‘ झकपक ’ पोषाखांत राहणारे लोक तरी आपल्या काकासारखे दुष्ट नसतील अशी त्याला खात्री वाटूं लागली. आणि त्यामुळें त्याला एकप्रकारचें समाधान वाटूं लागलें. इतक्यांत त्याला मोठा आवाज ऐकूं आला. लोक मोठमोठ्यानें ओरडत असल्याचें त्याला दिसून आलें. तो मोठ्या औत्पुक्यानें पाहूं लागला.

'दारू पीना हराम है !', 'दारू राक्षसाचा नाश करा !' लोक मोठमोठ्यानें ओरडत होते.

'आँ ! इथलीं माणसं बी दारू पित्यात ? 'छॅ ऽ छॅ ऽ असलीं माणसं कुठं दारू पित्याली ?' शंकर स्वतःशींच विचार करूं लागला.

त्याच्यापुढून मिरवणूक चालली. पांढरा शुभ्र खादीचा पोषाख केलेल्या स्वयंसेवकांचा बॅंड वाजत अग्रभागीं चालला होता. नंतर राष्ट्रीय तिरंगीं निशाणें उंच अंतराळांत फडकावीत केशरी साड्या परिधान केलेल्या स्वयंसेविका चालल्या होत्या. त्यांचे मागें मुंबई इलाख्याचे मुख्य प्रधान बाळासाहेब खेर यांची पुष्पांनीं सुशोभित केलेली मोटार चाललेली होती. त्यांच्या मागें दारुचा एक भव्य राक्षस गाडीवरून चालविला होता. आणि त्यांच्या मागुन नागरिकांची गर्दी होती. मुंबईला दारूबंदी होऊन एक वर्ष झालें होतें. पुण्यांतहि पूर्ण दारूबंदी करण्याचा पुणें नगरपालिकेनें निश्चय केलेला होता. सरकारचा त्याला पाठिंबा असल्यामुळें मुख्य प्रधानांच्या हस्तें आज दारूचा राक्षस शनिवारवाड्यापुढें जाळण्यांत येणार होता. आणि उद्यापासून दारूबंदीला प्रत्यक्ष सुरवात होणार होती.

ती सर्व मिरवणूक आणि त्या आरोळ्या वगैरे पाहून शंकरला फारच मौज वाटली. आपण आहोंत कोठें ? आपणाला जायचें आहे कोठें ? वगैरे गोष्टींचा त्याला पूर्ण विसर पडला. त्याचे पाय मिरवणुकीमागून आपोआप चालूं लागले.

मिरवणूक सभास्थानीं येऊन पोहोंचली. सभेला प्रचंड गर्दी जमलेली होती. सभेचे रीतसर कार्यक्रम झाल्यावर टाळ्यांच्या गजरांत मुख्यप्रधान बोलूं लागले—

"उद्याचा दिवस पुणें नगरपालिकेच्या इतिहासांत सुवर्ण अक्षरांनीं लिहून ठेविला जाईल. या पुण्यनगरींत उद्यांपासून दारूबंदी झाल्यामुळें तिला खरोखरच पवित्र स्वरूप प्राप्त झाल्याशिवाय राहणार नाहीं. कॉंग्रेसनें मंत्रिमंडळें बनविल्यापासून शेतकरीमजुरांच्या हिताच्या दृष्टीनें तीन वर्षांत दारूबंदी करण्याचें ठरविलें आहे. या दारूच्या राक्षसानें असंख्य शेतकऱ्यांच्या संसाराची होळी चालविली आहे. त्यांची बायकापोरें अन्नान्नदशेस पोहोंचली आहेत. लहान लहान कोंवळीं अर्भकें अन्नावांचून तडफडतांना पाहून प्रत्येकाच्या अंतःकरणाचें पाणी पाणी होत आहे. या भयंकर अवस्थेतून शेतकऱ्यांना वाचवावयाचें असेल तर त्यांनीं दारू सोडली पाहिजे.

"अमेरिकेलाच काय पण सर्व जगांत कोणालाहि साधलें नाहीं तें आम्ही आज सिद्ध करून दाखवणार आहोंत. पण तें कोणाच्या मदतीनं ? आपल्या ! आपण सर्वांनीं सहकार्य करून ह्या दारूराक्षसाची अशी राखरांगोळी........"

'धुम् धडाड् धाड्' असा मोठा आवाज झाला. दारूच्या राक्षसाचा नाश झाला. थोड्या वेळानें सभा संपली. दारू न पिण्याची शपथ घेत किंवा दारूबंदीला सहकार्य करण्याचा निश्चय करीत

लोक घरोघर निघून गेले. एवढा मोठा जमलेला प्रचंड जमाव एक तासाच्या आंत पार पांगून गेला.

रात्रीचे नऊ वाजले होते! शनिवारवाड्याच्या भव्य पटांगणांत आतां फारच थोडी गर्दी राहिलेली होती. शंकर भांबावलेल्या मुद्रेनें तेथेंच उभा राहिलेला होता. कोठें जावें हें त्याला सुचेना. काय करावें हें त्याला उमगेना. ‘ दारू पिणें वाईट आहे ’ एवढेंच फक्त त्याला माहीत होतें. आपल्या खेड्यांत एकहि दारू पिणारा शेत-करी त्यानें अद्यापपावेतों पाहिलेला नव्हता. त्यामुळें त्याच्या मनांत विचारांची भयंकर खळबळ माजून राहिली होती. तर इकडे सकाळ-पासून कांहींहि खावयास न मिळाल्यामुळें भुकेनें त्याचा जीव व्याकूळ होऊं लागला होता.

निर्बुद्ध झालेल्या माणसाप्रमाणें मिण्मिण् जळणाऱ्या विजेच्या दिव्याच्या उजेडांत तो इकडे तिकडे फिरूं लागला. ‘ दारू पीना हराम है ’ हा आवाज सारखा त्याच्या कानांत घुमत होता.

— **रामचंद्र नामदेव झोळ.**
बी. ए. [ ऑनर्स ] ( पुणें )






# अमृत

छुननन् ... छननन् ... छन् ! !

कलावन्तिणीच्या पायांतील चाळ वाजत होते. तबल्याच्या ठेक्याबरोबर ती आपला नाजूक देह मोठ्या चपलतेनें व कौशल्यानें इकडेतिकडे वळवीत होती. वांकडी टोपी घालून बसलेला तबलेवाला रंगून जाऊन तबल्याच्या चढउतार आवाजसवेंच मान खालींवर करीत होता. त्या नर्तकीच्या सभोंवतीं पांचसहा माणसें बसलीं होतीं. कलावंतिणीच्या अर्धनग्न देहाकडे, उन्नत उरोभागाकडे नि तिच्या मादक नयनांकडे ते रंगेल लोक उत्कंठापूर्वक पहात होते.

'अजुनि वय लहान' ही लावणी ती घोळघोळून व साभिनय म्हणत होती. समोरच गालिच्यावरील लोडाला टेकून बसलेला एक मध्यम वयाचा गृहस्थ मान वेळावीत म्हणत होता.

— " वाहवा ! बहोत खाशी ! ! "

तेथेंच मध्यभागीं एका लहानशा ट्रेमध्यें चारपांच कांचेचे सुंदर प्याले ठेविले होते व दोन दारूच्या बाटल्या आडव्या पडल्या होत्या. दारू प्याल्यामुळें तेथील सर्वांचे डोळे लालभडक झाले होते. एकंदोघांची बोलतांना बोबडी वळत होती. ते अर्धवट बेशुद्ध होते. आपण जणूं स्वर्गानंदच उपभोगीत आहों व आपणापुढें मेनकेसारख्या लावण्यसुंदर अप्सरेचें नर्तनगायन चालू आहे असा त्या मदिराभक्तांचा समज झाला होता !

" वा चंचला... कमाल कर दिया ! " तो मध्यवयीन गृहस्थ —अमृत— म्हणाला. चंचलेनें आपले माशासारखे डोळे एकवार अमृतकडे रोंखले व ती त्याच्या मांडीजवळ जाऊन बसली. अमृतनें एक दहाची नोट तिच्या हातीं दिली. ती नोट घेऊन चंचला पुन्हां नाचूं लागली.

" अरे दत्तू ! एक बाटली आण रे " तो ओरडला. गड्यानें व्हिस्कीची एक बाटली आणून दिली. एकमेकांना आग्रह करीत ती त्या सर्वांनीं संपविली. पुनश्च त्यांचे रंगढंग चालू झाले. पहांटेचा गार वारा सुटेपर्यंत हा कार्यक्रम चालू होता.

ज्या वाड्यांत नाचगायन सुरू होतें त्याच्या भव्य दगडी दरवाजांतून दोघे सभ्य गृहस्थ बोलत बाहेर पडले.

" रात्रीं खूप मजा आली नाहीं ? हा अमृतराव म्हणजे मोठा रंगेल मनुष्य दिसतो "—बापूराव म्हणाला. त्याचें वय तीस

पसतीसच्या सुमारास असून चेहेरा लांबट होता. मुद्रेवर करडे-पणाची झांक मारीत होती.

" म्हणजे ? रंगेल म्हटला कीं रंगेलच ! "— रामराव म्हणाला, " बाकी बापाची लाखापर्यंतची इस्टेट म्हणून आजपर्यंत निभावलं. आतां बड्या घराचा पोकळ वासाच उरला आहे. "

— " आणि त्या पोकळ वाशांत तुम्हांआम्हांसारखे भुंगे चैन करताहेत ! ह्यः ह्यः ! काय हो रामराव ! तुम्ही घेत नव्हतां ना कधीं ? रात्रीं बराच जोर उठविलात. मला बुवा जास्त खपत नाहीं. "

— " तर तर—म्हणे जास्त खपत नाहीं. माझ्या पुढचा रिकामा प्याला दोनदां उचलून तोंडाला लावलात कीं ! "

— " अहो चालायचेंच. तुम्ही त्यांतलेच, आम्ही त्यांतलेच. तुम्ही नाहीं का त्या बाईच्या पायाशीं लोटांगण घातलं ? "

" ह्यः ह्यः ह्यः " करीत रामराव मोठ्यानं हंसला. हास्याचा भर ओसरल्यावर तो म्हणाला— " हा अमृत आमचा जिगरदोस्त. त्याच्या जिवावर आमची दारूची चैन चालली आहे. आतां या दारूनं त्याला अगदीं पालथं घालायची पाळी आणली आहे ही गोष्ट निराळी ! पोंखरून गेलेली तुळई असते ना ? तशी आहे याची अवस्था ! अष्टौप्रहर बिचारा दारूच्या प्याल्यांत बुडा-लेला ! कायमची सुटका व्हायची या दारूमुळें ! "

—" लोकांच्या डोळ्यांतलं कुसळ तुम्हांला दिसतं आहे. पण तुम्ही काय कमी आहांत ? पहा हो अतिशय राक्षसी व्यसन आहे हें. मासा जसा गळाला भुलून प्राणास मुकतो तशी गत होते या दारू-मुळं. कोळ्यानं वर ओढून तापलेल्या वाळूंत टाकल्यावर होणारी एकाद्या माशाची तडफड पाह्यली आहे कां तुम्ही कधीं ? दारूमुळं माणसाला तसंच तडफडावं लागतं ! बरं पण काय हो रामराव, हा अमृत बेटा इतका ख्यालीखुशालींत असतो, याचं हें चालतं तरी कशाच्या जोरावर ? "

—" ती एक रडकथाच आहे. थोडी कां थोडकी ? लाखाची संपत्ति. चुटकीसरशी उडविली. कसला सुखानं संसार चाललेला ! दारूचा प्याला घरांत आणून मनुष्य घराला आग लावतो. बायकोला मारपीट करून यानं घराबाहेर हांकलली. ती बिचारी आतां मोल-मजुरी करून आपलं व दोन पोरांचं पोट भरतें ! "

—" अरेरे काय हो दैव तरी. "

—" हं आज हा अमृत दुसऱ्याच्या सुंदर तरुणीमागं असतो. बायका फितवायच्या आणि त्या मुंबईला नेऊन विकायच्या हा याचा धंदाच होऊन बसला आहे. बोलू नका हो कुठें ! पांचपांचशें रुपये आणतो एकेका बाईचे ! "

—" असं कां ? बरं आहे. आम्ही जातों. आतां बैठक केव्हां याच्यावर ? "

“ मी बोलावतों तुम्हांला, बापूराव ! बरं, नमस्कार ”— असें म्हणून रामराव निघून गेला.

रामराव एका बोळांतून वळला असें पाहून बापूरावनें कांहीं विचार करून परत अमृतच्या वाड्याकडे आपलीं पावलें वळविलीं !

× × ×

अमृतच्या वाड्यांतील एका खोलींत बापूराव व अमृत बराच वेळ बोलत बसले होते. सुमारें तासाभरानंतर बापूराव उठून आपल्या गांवची मोटर पकडण्याकरितां निघून गेला. जातांना त्याचे डोळ्यांत कसल्यातरी आनंदाची चमक मारत होती.

× × ×

सहा महिन्यांनंतरची गोष्ट.

चांदणी रात्र होती.

आपल्या वाड्याच्या गच्चीवर अमृत आरामखुर्चीत बसून सिगारेट ओढीत होता. त्याला एक माणूस भेटावयास यावयाचें होतें. पण नेहमींची वेळ टळून गेली तरी तें माणूस कां आलें नाहीं याबद्दल त्याला हुरहूर लागली. सहज पडल्या पडल्या तो गतगोष्टींबद्दल विचार करीत होता.

— ‘ सहा महिन्यांपूर्वीच्या एका बैठकीला एक नवीनच इसम आला होता. बापूराव त्याचं नांव. सकाळीं येऊन त्यानं आपणाला चंद्रा नांवाच्या एका तरुण विधवेबद्दल माहिती सांगितली. आपण

तिच्यावर प्रेम असल्याची बतावणी करावी, तिला भुलवावें व फूस लावून मुंबईस पळवून न्यावें. तेथें तिला विकून येईल तो पैसा दोघांनीं समान वांटून घ्यावा असं ठरलं. पसरलेल्या जाळ्यांत हरिणी गुंतूं पहात होती. अमृतच्या वरकरणी प्रेमास ती फसली. सापाची सोनेरी कांति पाहून कोणी त्याच्या मुखांतील विषाबद्दल तर्क करील कां? अर्थात् अनुभवानेंच मनुष्यानं आपलं ज्ञानभांडार समृद्ध केलं आहे. असा अनुभव चंद्राला यायचा होता. म्हणूनच ती फसली. आणि नित्याप्रमाणें यायची ती अजून कां आली नाहीं?....'

मंजुळ कंकणरवामुळें अमृतची विचारशृंखला तुटली. चंद्रानें नाजूक पावलें टाकीत येऊन अमृतचे डोळे झांकले.

" कोण आहे ओळखा? मग सोडतें " ती लाडिकपणें म्हणाली.

" ओळखूं? ओळखूं? चंद्रा!"

चंद्रानें हात सोडलें. त्यांचें बराच वेळ प्रेमालाप चालू होते. सहज बोलतां बोलतां अमृत म्हणाला—" चंद्रा! तुझं माझ्यावर प्रेम अगदीं खरं आहे ना? स्त्रियांचं मन त्यांच्या डोळ्यापेक्षांही चंचल असतं म्हणे!"

—" इश्श्, कांहींतरीच बोलणं. प्रेमाची परीक्षाच पाहायची कां तुम्हांला? मग द्या मला या गच्चीवरून ढकलून? तुमच्या इच्छे-खातर मी आनंदानं उडी घेईन!" असें बोलतांना तिच्या अंतःकरणांतील प्रेम तिच्या मुखमंडलावर नाचत होतें.

अमृतला वाटलें कशाला मी हा भोळा जीव गुंतवला? पण विकारांपुढें विचाराचा जोर टिकाव धरूं शकला नाहीं. त्याला गोड गोड बोलून मुंबईला चलण्याबाबतचें आश्वासन चंद्राकडून घ्यावयाचें होतें. तो तिला म्हणाला—

—"गाणं म्हण ना एकादं?

चंद्रानें आपल्या कोकिळकंठानें गायला सुरवात केली.

गाणें संपल्यावर अमृत आनंद दाखवीत म्हणाला,

—"आभाळांतील चंद्राच्या चांदण्यापेक्षां माझ्या चंद्राचं गाणं अधिक मोहक आहे!"

पुढें संधि साधून तो तिला आपला पळून जावयाचा बेत सांगू लागला. — "इथं भाऊबंद त्रास देतात. आपण मुंबईस जाऊं. मी कुठंहि दिवसभर काम करीन अन् आपण राघूमैनावाणी संसार करूं!"

भोळी बिचारी चंद्रा! अमृताच्या बोलण्याला तिनें संमति दर्शविली

अमृतनें चंद्राला अशा रीतीनें ठकवून मुंबईस एका कुंटणखान्यांत नेऊन विकलें!

सांपळ्यांत सांपडलेल्या उंदराला आपण सांपळ्यांत आहों हें कळतं. पण कांहीं उपयोग असतो कां त्याच्या धडपडीचा? आपलं दारूचं व्यसन चालावं म्हणून एका भोळ्या तरुणीला त्यानं नरकवासांत ढकललं—तथापि त्या स्त्रीचा तळतळाट भोगावा लागलाच त्याला!

अमृत मुंबईहून परत आला. बापूरावाला एक दिडकीहि देऊं नये

अशी वासना त्याला झाली व त्याप्रमाणें त्यानें बापूरावच्या मागणीला वाटाण्याच्या अक्षता लावल्या !

बापूराव किती झाला तरी दुष्ट मनुष्य ! मुंबईस जाण्यापूर्वी तेथील कुंटणखान्याची माहिती बापूरावला अमृतकडूनच समजली होती. तो तत्काळ मुंबईस गेला व पोलिसची मदत घेऊन त्यानें चंद्राला सोडवून आणलें. कोर्टांत चौकशी होऊन अमृताला दोन वर्षें सक्तमजुरीची शिक्षा ठोठावण्यांत आली.

मधील काळांत आठशें रुपये हातांत आल्यामुळें अमृतचें दारूचें व्यसन अतिरेकाला पोंचलें होतें. तो धड जेवणहि करीत नसे. दारूमुळें त्याची पचनशक्ति मंद झाली होती. शरीर अशक्त झालें होतें. दारूचा यकृत व मेंदू या दोहोंवरहि अतिशय वाईट परिणाम झाला होता.

पण तुरुंगांत त्याला दारू कोठून मिळणार ? दारू मिळाली नाहीं कीं तो एकाद्या श्रमिष्टासारखा वागे. दिलेलें काम त्याचें हातून पुरें झालें नाहीं म्हणजे वॉर्डर त्याला फटके मारी ! सारी रात्र तो जागून विव्हळत काढी. 'आपलें आयुष्य आपणच कसें धुळीला मिळविलें' हें आठवून तो आंसवें ढाळी. काय उपयोग होता त्याचा ? तो बडबडायचा —

— "परमेश्वरा ! कशाला ही दारू निर्माण केलीस ? ही दारू ताबडतोब कुठें तरी दूर दूर नेऊन गाड. हजारों अनाथ बाया-

बापड्यांचे, तडफडणाऱ्या मुलाबाळांचे धन्यवाद तुला मिळतील! दारू! राक्षसी दारू!!"

दारूच्या व्यसनानें त्याला पुरेंच वेडें केलें. दिवसांतून चारपांच वेळां दारू पिणाऱ्या अमृताला दारूचा एक थेंबहि मिळण्याची शक्यता नव्हती! दारूनें आपल्या घरादारावर नांगर फिरविला, सुखाची होळी पेटविली हें त्याला समजत होतें. पण तें आतां!

आपले तारवटलेले डोळे विस्फारीत तो वेड्यासारखा नाचे. दारूमुळें अगोदरच त्याचा मेंदू हलका झाला होता! त्यांत या संकटाची भर पडल्यानें व दारू न मिळाल्यानें त्याला वेड लागण्याची पाळी आली.

एक दिवस तो असाच दारूसाठीं अगदीं बेचैन झाला.

रात्रींची वेळ होती! अशा कित्येक रात्रीं त्यानं आपल्या रंगमहालांत दारूच्या पेल्यावर पेले झोकून नायकिणींच्या सहवासांत काढल्या होत्या. आजची रात्र निराळी होती. त्याला दारूशिवाय कांहींच सुचेना! तो उठून उभा राहिला! मनाशींच एकवार हंसला. किती भेसूर हास्य होतें तें!

— तुरुंगांतील खोलीच्या एका भिंतीस पाठ टेकून तो उभा राहिला व अतिशय वेगानें धांवत जाऊन त्यानें समोरच्या दगडी भिंतीस जोरानें धडक घेतली.

— किंकाळी ऐकूं आल्यामुळें वॉर्डर धांवत आला व कंदि-

लाच्या उजेडानें पहातो तों अमृत जमिनीवर निपचीत पडलेला दिसला ! त्याच्या तोंडांतून फेस येत होता. डोळे वर लागले होते. त्याच्या कुडत्यावर व विजारीवर रक्ताचे ओघळ वहात होते ! श्वास आंत आंत चालला असतांहि अमृत घसा खाकरीत म्हणत होता— " दारू ! दारू ! "

— **विनायक महादेव कुलकर्णी.**
( मनेराजुरी–सातारा )



९

# सुखाचा संसार

१९४१ सालची गोष्ट !

आमच्या शेजारीं एक नवीन गृहस्थ राहावयास आले होते. त्यांच्या कुटुंबांत ते, त्यांची बायको व नऊदहा वर्षांचा एक मुलगा एवढींच माणसं होतीं.

गृहस्थाचं वय होतं जवळजवळ पन्नास वर्षांचं. पण त्याची वागणूक मोठी विलक्षण होती. कामावरून आला कीं, बायकोला सोडून तो खोलींतून बाहेरच पडत नसे कधीं. मात्र रजेच्या दिवशीं त्याची खोली बाहेरून बंद असे. बायको आणि मुलगा यांना बरोबर घेऊन तो कुठंतरी बाहेर जात असे.

आमचे शेजारीं राहायला येऊन त्याला एक महिना होत आला, पण त्याच्याशीं बोलण्याचा एकहि प्रसंग आला नाहीं. त्याची बायकोसुद्धां कधीं आमच्याकडे आली नाहीं. मुलगा मात्र केव्हां-

केव्हां आमच्या मुलांत खेळायला येत असे.

त्या गृहस्थाचं असं विचित्र वर्तन पाहून मी एकदां त्या मुलाला प्रश्न केला— " बाबा काय करताहेत रे तुझे ? "

" आईशीं बोलताहेत ! "

दुसऱ्यांदा तसाच प्रश्न केला असतांना तो मुलगा म्हणाला, " आईला पुस्तक वाचून दाखवताहेत ! "

माझं कुतुहल वाढत चाललं. मी आतां आपणहून त्यांच्याशीं बोलण्याचं ठरवलं.

तो रजेचा दिवस होता. तो गृहस्थ केव्हां खोलीबाहेर येतो याची वाट पाहात मी ग्यालरींत उभा राहिलों. त्याचा मुलगा आमच्या खोलींत खेळत होता. मुलाला पाहाण्यासाठीं सहज तो गृहस्थ बाहेर आला. तेवढ्याचा फायदा घेऊन मी म्हटलं—

" मुलाला पाहातां होय ? खेळतो आहे तो आमच्याकडे ! "

" बरं ! खेळूंद्या ! " असं म्हणून तो खोलींत जाण्यासाठीं वळला. तेव्हां मी पुनः म्हणालों,

" या ना आमच्या खोलींत, बसूं बोलत ! "

तो एकदम थांबला.

" जेवण झालं आहे ना आपलं ? मग या, बसूं बोलत ! "

असं मी म्हटल्यावर कांहींशा नाखुषीनं कां होईना त्याला आमच्या खोलींत येणं भाग पडलं. तो आंत येऊन बसल्यावर

थोड्या वेळानं मी बोलायला सुरवात केली—

" आपलं नांव काय ? "

" गोविंदराव ! "

" आपल्याला एक प्रश्न विचारूं का ? राग नाहीं ना येणार ? "

" मला समजला तुमचा प्रश्न ! "

तो पुढं काय म्हणतो याकडे माझं लक्ष लागलं.

" माझ्या वर्तनावरून मी माणूसघाणा व स्त्रीलंपट आहे अशी तुमची समजूत झाली असेल ! "

" छे; छे; " मी म्हणालों.

" आणि तुम्हांला तसं वाटलं तर त्यांत तुमची कांहीं चूक नाहीं. मी असा कां वागतों हें तुम्हांला समजावून द्यायचं तर माझ्या आयुष्यांतली एक कहाणी सांगावी लागेल ! "

" आपणांस अयोग्य वाटत नसल्यास खुशाल सांगा ! "

" सांगतों मी पाहिजे तर ! पण ती ऐकून तुमचा कांहीं फायदा होणार नाहीं ! "

" आपली हरकत नसली तरच सांगा. "

असं मी म्हटल्यावर गोविंदरावानं सुरवात केली—

" ती फार मोठी कहाणी आहे, पण आपणांस मी ती थोडक्यांत सांगतों. मी अशिक्षित माणूस आहे. मला सरळ बोलतां येत नाहीं. तेव्हां जें बोलेन तें समजून घ्या. "

" त्याची नको काळजी ! "

" मग ऐका. माझा जन्म कोकणांत एका तालेवार सुखी कुटुंबांत झाला. माझा बाप मोठा श्रीमंत पण भोळा होता. दानधर्म यावर त्याची मोठी श्रद्धा. दर पौर्णिमेस सत्यनारायणाची पूजा व्हायची आमच्याकडे. शंभर पानांचं ब्राह्मण–जेवणसुद्धां व्हायचं. देव, धर्म, दान व दक्षणा यांत हजारों रुपयांचा दरवर्षी चुराडा होऊं लागला. लोक वडिलांना धर्मशील म्हणत आणि तेवढ्यानं आमचे वडील समाधान पावत. अशा उधळपट्टीनं आमच्या घराण्याला वाईट दिवस आले. एकेक करतां अर्धीअधिक जमीन सावकाराच्या हातांत गेली. हजारांनीं कर्ज झालं. अशा स्थितींत वडील वारले. मी अवघा एकोणीस वर्षांचा होतों. मला दुसरं भावंड नव्हतं. वडिलांच्या मृत्युनंतर सावकार येऊन दारांत बसले. त्यांच्या कर्जफेडी-साठीं होती नव्हती ती जमीन त्यांच्या घशांत ढकलणं मला भाग पडलं. एकेकाळचं आमचं वैभव जाऊन मला आणि माझ्या बायकोला पोटाची पंचाईत उत्पन्न झाली. वडिलांच्या मागं एक वर्ष कसंबसं ढकललं. शेवटीं जगण्याचा मार्ग शोधण्यासाठीं बायकोला माहेरीं पाठवून मी मुंबईचा रस्ता सुधारला. मुंबईत आल्यावर नोकरी मिळे-पर्यंत काय काय हाल झाले ह्याचं वर्णन करीत नाहीं.

" मला एका गिरणींत नोकरी मिळाली. वर्षाच्या आंत मी बायकोला मुंबईला आणलं. माझे दिवस अगदीं आनंदांत जाऊं

लागले.

" बायकोला आणल्यावर एकदोन महिन्यांनंतरचा प्रसंग. तो पगाराचा दिवस होता. पगार घेऊन मी घरीं आलों, नेहमींपेक्षां थोडा उशिरानंच आलों. माझ्या बायकोनं दारांतच माझं स्वागत केलं. पण मी तिच्याशीं न बोलतां सरळ खोलींत जाऊन चटईवर अंग टाकलं. ती माझ्या अगदीं जवळ येऊन बसली.

" डोकं दुखतं कां ? " असं म्हणून तिनं माझ्या डोकीला हात लावून पाहिला.

" काय वाटतं आपल्याला ? " असं म्हणत तिनं माझं तोंड आपल्याकडे फिरवलं तोंच तिला वसकन् माझ्या तोंडाची घाण आली.

" हें काय ! काय केलंत हें आज ! " एकदम दचकून ती ओरडली.

" तुझी शपथ आतां नाहीं असं करणार ! मोठ्यानं बोलूं नकोस. लोक ऐकतील. "— अशी मी तिची हळू आवाजांत समजूत घातली.

" तुम्हांला मुंबईला आल्यापासून मी सांगत आहे .... "

" देवाशपथ मी घेणार नव्हतों. पण मित्रांनीं ' घे ' म्हटलं आणि माझा नाइलाज झाला. आमचे दादामास्तरसुद्धां होते. मग त्यांच्यासमोर न घेऊन कसं चालेल ! सांग, तूंच सांग, मी थोडी-

सुद्धां घेतली नसती तर त्यांना काय वाटलं असतं! त्यांचा मान नको का राखायला?" असं म्हणत मी उठून बसण्याचा प्रयत्न केला.

"आज दुसऱ्यांच्या मानासाठीं घेतलीत उद्यां स्वतःच्या मनानं घ्याल!"—असं म्हणतांना बिचारीचा कंठ दाटून आला.

तिची ती स्थिति पाहून मी तिला म्हणालों,

"खरोखर यापुढं मी असं करणार नाहीं!"

"माझी शपथ?"

"तुझी शपथ!"

पण ती शपथ मी पाळली नाहीं. दररोज थोडीतरी दारू घेतल्याशिवाय मी घरीं येत नसे. बायको रागावली कीं, प्रथम प्रथम मी तिची क्षमा मागे. पुढं बायकोच्या उपदेशाचा मला राग येऊं लागला. "नेहमीं नेहमीं काय तुझी कटकट!" असें म्हणून एक दिवस तिला चापट मारली, दुसऱ्या वेळीं लाथ आणि तिसऱ्या वेळीं....

"एव्हांना मी पक्का दारूबाज बनलों होतों. दिवसेंदिवस माझी दारूची पिपासा वाढत जाऊं लागली. माझा पगार वाढत होता तसा माझा खर्चहि वाढत होता. मी आतां गिरणींत मुकादम झालों होतों.

"पगार पुरेना म्हणून मी कर्ज काढून दारू पिऊं लागलों. वाणी,

पठाण, मारवाडी व भाडेवाला दारावर येऊन बसूं लागले. नाइलाज होऊन माझी बायको कामावर जाऊं लागली. माझं आयतं फावलं. मी माझा व बायकोचा दोघांचाही पगार दारूपायीं उडवूं लागलों. बिचारी बायको आतां मेटाकुटीला आली, पण मला तें दिसलं नाहीं. मी दारूमुळं आंधळा बनलों होतों.

" पगाराचे एकदोन दिवस मी घरींच येत नसे. एकदां मी रात्रीचे दोन वाजतां घरीं आलों. मला पाहून तिचा राग अनावर झाला. ती जवळ जवळ ओरडली– " कुठं होता रात्रभर ? आतां घरीं यायला ××× नाहीं वाटली ? पगार आणा कुठं आहे तो ? "

" माझा पगार मागणारी तूं कोण ? माझ्या पगाराचं मी वाटेल तें करीन ! तुला कोण विचारतो ? " असं बडबडून मी जमिनीवर पडलों. ती स्वतःच्या जिवाला वैतागली होती. माझी पर्वा न करतां ती म्हणाली,

" दारू पितां त्यापेक्षां दुसरं कसं कांहीं पीत नाहीं ? पगार उडवलांत आणि सकाळीं देणेंकरी येईल त्याला काय द्याल ? "

तिच्या या बोलण्याबद्दल तिला मी अशी लाखोली वाहिली कीं कांहीं विचारूं नका. माझ्या शिव्यांनीं ती जास्तच संतापली.

" बायको बोलते ती मिजास झाली नी उद्यां पठाण न् मारवाडी आईचा उद्धार करतील तेव्हां ? उद्यां भाडेवाल्यानं स्वतःच्या घरीं जेवायला बोलावलं आहे तुम्हांला. ही घ्या आमंत्रणपत्रिका ! " असें

म्हणून खोली खालीं करण्याबद्दलची नोटीस तिनं माझ्या अंगावर फेंकली.

नोटीस पाहून मला चीड आली. मी एकदम कोंपऱ्यांतला बांबूला हात घातला. कपाळावर बांबू बसतांच ती धाडकन् खालीं जमिनीवर कोसाळली. तिचं डोकं रक्तबंबाळ झालं. तिच्या किंकाळीनं शेजारी जागा झाला. त्यानं येऊन तो प्रकार पाहतांच चाळींतल्या बाकीच्या लोकांना उठवलं. माझी बायको बेशुद्ध पडली होती. लोकांना वाटलं कीं मेली असावी. त्यांनीं मला पोलिसच्या स्वाधीन केलं. माझी दारू उतरली. मला वाटलं मी आतां फांशी जाणार.

" पण माझ्या बायकोनं मला सोडवलं. शुद्धीवर आल्याबरोबर तिनं अगोदर माझी सुटका केली. यानंतरहि मी शहाणा झालों नाहीं. मी आतां मास्तर झालों, माझा पगार वाढला. तथापि दारू पिण्याचा नेहमींचा कार्यक्रम जोरांत चालूच होता. पण ....

१९३९ सालचा ऑगस्ट महिना !

त्या महिन्यापासून काँग्रेस सरकारनं मुंबई शहरांत दारूबंदी केली. मला संताप आला काँग्रेसचा. " काँग्रेसनं आमचे पगार वाढविण्याचं सोडून दारूबंदी केली हा फार मूर्खपणा झाला " असं लोकांबरोबर मीहि म्हणूं लागलों. दारूशिवाय अन्न गोड लागेना मला. वेड्यासारखी स्थिति झाली माझी. दारूच्याऐवजीं दुसरं कांहीं तसलंच पेय प्यावं असा विचार आला मनांत पण तसं करायला धैर्य

होईना. असंच कांहीतरी पिऊन आमचा एक शेजारी एकाएकीं मेला होता. मी त्या महिन्यांत दहाबारा दिवस कामावर गेलों नाहीं. एक महिन्यानंतर दारूचा थोडाथोडा विसर पडूं लागला आणि नंतर........

" पगाराचा उपयोग आपोआप कर्जफेडीकडे होऊं लागला — संपली माझी कहाणी. मागचं सगळं मी विसरून गेलों आहें. आज मी पूर्ण सुखी आहें आणि याचं श्रेय कॉंग्रेसच्या दारूबंदीला. बायकोला तरुणपणीं कधीं सुखाचा शब्द दिला नाहीं त्याची मी भरपाई करतों आहें आतां ! "

बोलणं संपवून गोविंदराव हंसूं लागला. मला आतां त्याच्या वागणुकीचा पूर्ण उलगडा झाला. मी म्हणालों,

" खरोखर कितीतरी कुटुंबं सुखी झालीं असतील या दारू-बंदीमुळं ! "

—तुकाराम तानाजी सावंत.
( मुंबई )



# १०

## दारूबंदी

" असं का बरं करतासा खुळ्यावाणी? सोन्यासारखीं लेकरं अन्नापाण्यावांचून तळमळत्याती, अंगावर धडुत नाहीं, तुमचं पहिलवानावाणी आंग, काय बी राह्यलं नाहीं आंगामंदी, किडुकमिडुक भांडी सारी सारी इकलिसा दारूपायीं आणि हें एक सोभाग्याचं लेणं तेबि आतां मागतासा. माझ्या गळ्याची शपथ, पोरांची शपथ, आतां दारू तेवढी सोडा. काय हाय त्यांत? अंगाची खराबी, अब्रूची खराबी. वर्साचा सन आला, लोक काय काय करत्याली आणि माझी पोरं.... " पुढचं मंजुळेला अनिवार झालेल्या हुंदक्यामुळं बोलतां आलं नाहीं. आपल्या फाटक्या पदरानं अश्रूला बंधारा घालण्याचे फुका प्रयत्न ती करीत होती.

मध्यान्ह रात्रीं रामा दारूची धुंदी उतरल्यावर घरीं आला तेव्हां मंजुळा त्याला वरीलप्रमाणें बोलत होती. नवऱ्याला उपदेश करायचा,

रडायचं, आणि धाकधुक दाखवूं लागला कीं दळणकांडण करून मिळवलेली पैन् पै मुकाट्यानं त्याच्या स्वाधीन करायची हा मंजुळेचा नित्य क्रमच होता.

रामा शिंदे जरी घरंदाज नव्हता तरी खाऊनपिऊन सुखी होता. सरदार घराण्याचा तो वंशज होता. आपल्या वंशजाचा, त्यांच्या पराक्रमाचा त्याला अतिशय अभिमान होता. आपल्या वृद्ध बापाचा एकुलता एक मुलगा होता तो. त्याचं लग्न मंजुळेशीं — बालबोध घराण्यांतील एका गुणी मुलीशीं झालें. त्याच्या बापानें लग्नासाठीं आपल्या चार एकर जमिनीवर दोनशें रुपये कर्ज काढलें. वृद्ध वडील लग्नानंतर लवकरच हें जग सोडून चालते झाले.

रामा मंजुळेसह आपल्या जमिनीचे कष्ट करून प्रसंगीं मजुरी करून काल क्रमूं लागला. तरणा बांड मराठा गडी, आपल्या अंगच्या हुशारीनें, प्रामाणिक आणि कष्टाळू वृत्तीनें गल्लींत सर्वांचा आवडता होता. मंजुळाहि स्वभावानं मोठी गोड आणि सालस बाई होती. कुणाचं एक नाहीं, दोन नाहीं. बाहेरच्या दिखाऊ, ढोंगी अन्यायी जगाची ओळख नाहीं. अशा त्या प्रेमळ जोडप्यांच्या इवल्याशा संसारांत स्वर्गीय सौख्य नांदत होतें.

पण दैवाला कुठं हें पहावतें? जिथं जिथं असं चांगलं असेल तें घर अगदीं तांदळांतल्या खड्याप्रमाणें वेंचण्यांत त्याचा अगदीं हातखंडाच म्हणाना. मंजुळेच्या गृहराज्यांत मुलांची भर पडूं

लागली. वाढता संसार आणि मंदी यांमुळं सावकाराचें व्याज देखील फिटेना. झालं! नदीच्या पाण्याप्रमाणें कर्जाचा आंकडा फुगूं लागला. सावकाराचा दिवाणजी येऊन रोज पैशापायीं रामाला, त्याच्या बायकोला आणि अजाण बालकांनाहि शिव्यांच्या लाखोल्या वाहून जात असे. स्वतःच्या तोंडासमोर परपुरुषानं बायकोला बोलावं हें कोणत्या पुरुषाला आवडेल? कित्येक वेळां मारामारीचे प्रसंग यायचे, पण शेजाऱ्यापाजाऱ्याच्या मध्यस्थीनें ते मिटत असत. दोनशेंचे चारपांच वर्षांत तीन हजार झाले. रामाची छाती दडपून गेली. कायदा सावकाराचा पाठिराखा. जप्ती झाली. रामा वाडवडिलार्जित घराला आणि शेताला मुकला.

मंजुळेच्या दुःखाला पारावार नव्हता. मुलंबाळं वणावणा हिंडूं लागलीं. रामाला तें सर्व पहाणं असह्य झालं. पण करणार काय? तो मनाचा अतिशय दुबळा बनला. आणि अशाच वेळीं कुठल्याहि व्यसनाचा माणसाला आश्रय करण्यास फावतें नाहीं कां? स्वताचं दुःख, अपमान, मंजुळेचं केविलवाणं तोंड आणि पोरांचं रडणं क्षणभर कां होईना दृष्टिआड करण्यासाठीं रामाला दारूशिवाय दुसरा 'जीवश्च कंठश्च' दोस्त कोण असणार बरं? रामा दारूबाज बनला. स्वतःला, मंजुळेला, सर्वांना तो विसरला. पुरा निर्लज्ज बनला. दारूसाठीं लहानमोठ्या चोऱ्याहि करूं लागला. काय ही दुर्दशा? घरच्या मालकाची ही अधोगति झाल्यावर स्त्रीचे हाल

काय विचारावेत ? सारे दुष्ट लोक 'हात धुवून' तिच्या पाठीं लागले. अब्रूनं जगणं मंजुळेला कठीण जाऊं लागलं. सावकाराचा तिच्यावर कटाक्ष होता. दारूबाज रामाच्या हें लक्षांत यायला वेळ लागला नाहीं. अशाच एका प्रसंगीं झोंबाझोंबींत रामानं त्याला खरपूस मार दिला. कायद्यानं त्याला शिक्षा झाली दोन वर्षांची.

तो शिक्षा भोगून आला. समाजानं त्याला बहिष्कृत केलं. तुरुंगांत जाऊन आलेला मनुष्य समाजाच्या दृष्टीनं नादान ठरतो. रामा चोर आहे, दारूबाज आहे आणि माथेफिरू आहे इतके गुन्हे समाज कधींतरी खपवून घेईल कां ? त्याचे सर्व सवंगडी पसार झाले. त्याच्याकडं पाहून जो तो विकट हास्य करूं लागला. आणि रामा हा त्रास चुकविण्याकरितां बाटलीकडे अधिक जोरानं ओढला गेला.

दारूबंदीची चळवळ सुरू झाली. एक कॉंग्रेस प्रचारक रामाच्या गांवीं आला. चावडीसमोर सभा भरली. प्रचारक मोठमोठ्या शब्दांत व्याख्यान देत होता—

"लोकहो, दारू वाईट आहे, आपल्या मायभूमीला, हिंदमातेला, राष्ट्राला लागलेली ही कीड आहे. राष्ट्राचा उद्धार करणं प्रत्येकाचं कर्तव्य आहे" वगैरे वगैरे.

बिचाऱ्या शेतकऱ्यांना राष्ट्र, देश हे कशाशीं खातात ह्याची कल्पनाहि नव्हती. मरेपर्यंत काम करणं श्रीमंताचे शिव्याशाप

खात त्यांची सेवा करणं आणि नशिबाच्या नांवानं ओरडत बसणं हेंच त्यांचं कर्तव्य !

" काय ? काय म्हणतां ? दारू वाईट ? " कोपऱ्यांतून आवाज आला. आवाजाच्या दिशेला सर्वांचीं तोंड वळलीं. तो रामा होता. " शूः शूः " चा भडिमार झाला त्याच्यावर. " हं चालूं द्या. तो दारूबाज आहे, माथेफिरू, चोर आहे हो ! " असं सावकारानं प्रचारकाला सांगितलं आणि " व्हय महाराज " अशी पुस्ती सर्वांनीं जोडली. रामाचे डोळे गरगर फिरत होते. " मी चोर, दारू-बाज, माथेफिरू, तूं – तूंच कारण " असं म्हणत म्हणत व्यासपीठा-जवळ येऊन पोहोंचला.

रामाला कुठला आवेश आणि सभाधीटपणा आला होता कोण जाणे. प्रसंगानं मनुष्य धीट होतो हेंच खरें. " महाराज, आमच्या जवळची अब्रू नेली, श्यात नेलं, घरदार नेलं. पॉटभर धड खायला मिळना. सरकार, आम्ही बायका म्हणावं तर हातांत काकणं नाहींत. बापई म्हणावं तर बायको जबरी करणाऱ्याच्या नरडीचा घोट घेण्याची ताकद नाहीं आमच्यांत...." सावकाराकडे पाहून त्यानं खरंच मूठ वळवली.

" चार पैका करज काढलं कीं चार हजार होत्याती. आमास्नी काय लिवणं काय पुसणं. आंगठा उठीव म्हटलं कीं उठिवतो आणि घरादाराला मुकून बसतो. ही बाटलीच आम्हांला सूख देतिया.

हिला पचवून – आमीं आमचं मन मारतो, पोराबाळांचं रडं, बायकांची दशा विसरतो, तीबि आमच्यापसनं घ्यावी म्हणतां? देवा, गरिबाचा वाली कोणी नाहीं रं. आम्हांला ही बया वाईट हाय तें कळतया. साऱ्यास्नी कळतया. आम्हीं सारीं आमच्या वनवासाचा विसर पाडण्यापायीं हिच्या मागं लागतो. आमीं गटारांत लोळतो, बायकांपोरं रडत्याती. साहेब, शिरिमंत लोक आमचं गळं कापून घेतलेला पैसा खर्चून येळ घालवण्यापायीं दारू पित्याति. आणि आम्हीं लोक आमचं हाल विसरण्यापायीं हिचा आसरा करतो. आमच्या रक्ताचं पाणी करून बांधलेल्या बंगल्यांतनीं, आमच्या बायका पोरांचं सराप घेत शिरिमंत लोक दारूच्या नरकांत लोळत्याति. आणि आम्हीं आमच्या ह्या हाडाला आणि मनाला घटकाभर तरी सुख लाभावं म्हणून आमच्या उकिरड्यांतनी अन्नापाण्यांवाचून शेणांतल्या किड्यावाणी दारुच्या बाटलीला घेऊन लोळतो. ” रामाच्या बोलण्याचा जनसमूहावर अत्यंत परिणाम झाला.

निरक्षर, अडाणी, दु:खांनीं गांजलेल्या खेड्यांतील शेतकरी वर्गांपुढें आपल्या मराठी भाषेच्या विद्वत्तेचा प्रकाश पडणार नाहीं हें प्रचारकाला कळलं. दारूबंदी जितकी अवश्य आहे, तितकीच किंबहुना अधिक निरक्षरतेची व सांपत्तिक विषमतेची राष्ट्राला लागलेली कीड नाहींशीं करणें विशेष जरूरीचें आहे.

प्रचारक पुढें म्हणाला—" लोकहो, खरंच दारू वाईट आहे. तें व्यसन लागण्याचं कारणहि तितकेंच घातक आहे. जनहो, जगाच्या सुरवातीपासून गरीब—श्रीमंत, भांडवलदार—मजूर, सावकार—कूळ, उंदीर—मांजराप्रमाणें झगडत आले आहेत. ह्या दोन्हीं वर्गांना मध्यम वर्गांत आणून सोडल्याखेरीज आणि ही घातकी विषमता समूळ नष्ट केल्याखेरीज आपणांला सुख लागणार नाहीं. गरीबांच्या अडचणी दूर करण्याचा, त्यांना साक्षर करण्याचा प्रयत्न कॉंग्रेस करीत आहे, पण तुम्हां सर्वांची मदत पाहिजे. तुम्हांत एकी पाहिजे.

रामाला कोण आनंद झाला !

" काय म्हणतां साहेब ? शिरिमंतरलाबि आमच्यांत ओढायचा आणि आमीबि तेंच्यांत मिसळायचं. मग काय रामराज्यच आलं की. ए, बघतां काय, ह्यें काय सांगत्याति ऐकूं सारी जणीं ? आणि साहेब, आमच्या घरीं चला की शेंगा गूळ खाऊन जावा थोडं. "

कॉंग्रेस प्रचारकाला रामाचं प्रेमळ आमंत्रण स्वीकारण्यांत आनंद होत होता हें त्याचा चेहेरा सांगत होता.

—कु. मालती भाऊराव दटमजगे,
बी. ए. [ ऑनर्स ]
( कोल्हापूर )

---

# ११

## मालक आणि मजूर

**तो** एक गिरणीकामगार होता. पहाटेच्या पांचच्या भोंग्याबरोबर उठावयाचें, भाकर बडवावयाची अन् सातचा भोंगा होण्याच्या आंत बरोबर शिदोरी घेऊन कामावर हजर रहावयाचें. दुपारच्या सुट्टींत शिदोरीचा फडशा पाडावयाचा की पुन्हां कामाला जुंपी व्हावयाचें. संध्याकाळीं सहा वाजतां गिरण सुटतांच सुलेमानच्या ताडी-गृहांत प्रवेश करावयाचा आणि शिणवठा घालविण्यासाठीं मनसोक्त बाटलाबाईच्या स्वाधीन व्हायचें – हाच त्याचा नित्य क्रम असे. त्याला ना घर ना दार. अगदीं एकटा प्राणी. बोलूनचालून गिरणींतला मजूर तो ! पैशाची टंचाई त्याला पदोपदीं त्रास देई. पण केवळ पोटासाठीं आणि वाढत्या व्यसनाच्या पूर्ततेसाठीं रात्रपाळी अगर इतर बिगारकामें करावयास तो तयार असे.

आरंभीं निरक्षर होता तो. पण त्रिविक्रम शेटजींच्या माणिक मिल-

मध्यें आल्यापासून मणिकुंवरनें — शेटजींच्या एकुलत्या एक कन्येनें — काढलेल्या सुट्टीच्या वर्गांचा त्यानें योग्य उपयोग करून घेतला. सदूसद्विवेक बुद्धीची टोंचणी व मणिकुंवरची प्रेमळ शिकवण यामुळें दारू पितांना त्याच्या मनाची रस्सीखेंच होत असल्यास नवल नाहीं. केळीच्या सालींवर पाय ठेवण्याचाच अवकाश की ज्याप्रमाणें पाय घसरून आपण पडतों, त्याचप्रमाणें व्यसनाच्या आधीन होणें अतिशय वाईट असें कळूनहि तो पुरापुर मद्यपि बनला होता. मणिकुंवरच्या शिकवणीमुळें त्याची दररोजची दारू लहरीवर आली होती एवढेंच !

काल रात्रीं दारूच्या अंमलांत रात्रपाळी केल्यामुळें आज सकाळीं सातच्या भोंग्याबरोबर हजर रहाण्यास त्याला तासभर उशीर झाला. दारावरच्या दरवानानें त्याच्या कर्तव्याप्रमाणें त्याला मुनिमाकडे नेलें. मुनिमाचा त्याच्यावर आधींचा राग. त्यांतून मगनलाल माणिकुंवरच्या वर्गांत जाऊन शिकलेला ! दिवाणानें मागचा पुढचा कांहीं एक विचार न करतां एक सबंध दिवसाची रजा मांडली. वास्तविक काल रात्रपाळी करून सकाळीं तासभरच उशीर झाला म्हणून दिनकर दिवाणानीं त्याच्या मजुरींत वाढ करावयास पाहिजे होती. पण कांहीं कांहीं वेळां हे मुनिमच मालक होऊन बसतात. मगनलाल दिवाणाच्या हातापायां पडला पण पाषाणाला कुठून पाझर फुटणार ? माणिकुंवरच्यामार्फत

त्रिविक्रम शेटजींच्या कानांवर सारी हकीगत घालावी असें मगनलालला वाटलें. आजच्यासारखे अपमानाचे अनेक प्रसंग मागें पुष्कळदां येऊन गेले होते. पण काय? त्रिविक्रम शेटजींचें कुलूप मुनिमाच्या किल्लीनें अलिकडे उघडावयास लागलें होतें. त्याला तो तरी काय करणार?

माणिकमिलचे मालक त्रिविक्रम शेटजी ज्यावेळीं देशावरून येथें आले त्यावेळीं ते भिक्षाधिश होते. पण प्रिय पत्नी माणिकबाई यांच्या प्रयत्नामुळें स्थापन झालेल्या माणिकमिलच्या योगानें भिक्षाधिशाचे लक्षाधिश व्हावयास त्यांना वेळ लागला नाहीं. माणिकबाई आणि त्रिविक्रम शेटजी यांच्या सौख्यसागरांस भरती आणण्याकरितांच कीं काय माणिकुंवरचा जन्म झाला. खरोखरच दृष्ट लागण्यासारखे ते कुटुंब होते त्यावेळीं!

गरिबींतून श्रीमंती आली म्हणजे मनुष्याला एक प्रकारचा कैफ चढत असतो. गरिबींत सोसलेल्या हालअपेष्टांचें उट्टे काढण्यास त्याचें हृदय तयार असते.

लक्ष्मीला एके ठिकाणीं रहाणें आवडत नाहीं असें म्हणा किंवा उंच पदावर चढलेला मनुष्य खालीं पडतो म्हणून म्हणा दिवसें दिवस उतरत्या वयाप्रमाणें शेटजींच्या संपत्तीलाहि उतरती कळा लागली होती. लक्ष्मीनें गृहत्याग करण्यास आरंभ केला असें पाहून त्रिविक्रम शेटजींच्या गृहलक्ष्मीनेंहि त्यांचा एकाएकीं

त्याग करून इहलोकीची यात्रा संपविली होती.

संकटें आलीं कीं चोहोंकडून येत असतात. सत्ता आणि संपत्ति-मुळें मदांध बनलेल्या त्रिविक्रम शेटजींना लागोपाठ धक्के बसूं लागले. माणिकबाईंनीं डोळे मिटल्यानंतर मदिरादेवीचा अम्मल त्रिविक्रम शेटजींच्यावर बसूं लागला. दिनकर दिवाण ठरवितील ती दिशा असें होऊं लागल्यामुळें माणिकमिलचा कोळसा होण्यास वेळ लागला नाहीं. दारूच्या जोडीला शर्यत आणि सट्टा आल्यामुळें त्रिविक्रम शेटजींच्यावर त्रि—वार हल्ले होऊं लागले. एकेकाळीं सावकारी करणारे शेटजी आज स्वतःच सावकाराच्या घरांकडे धांव घेऊं लागले होते. कोळ्याच्या जाळ्यांत सांपडलेल्या माशाप्रमाणें व्यसनी माणसाची स्थिति होत असते. व्यसनांतून सुटण्याचा प्रयत्न करावा तों तों व्यसनाच्या खोल गर्तेंत जाऊन त्याला पडावे लागतें. व्यसनी मनुष्य व्यवहारास अपात्र ठरतो. माणिकमिल गहाण टाकून शेटजींनीं दिनकर दिवाणांच्या सल्ल्यावरून सारा पैसा सट्ट्यांत घातला होता.

मणिकुंवरनें त्रिविक्रम शेटजींच्या असल्या पडत्या काळांतहि शिकून पदवी संपादन करून घेतली होती. त्रिविक्रम शेटजींना आपले सांगणें पटत नाहीं असें मणिकुंवरला समजतांच ती अगदीं स्वतंत्र राहूं लागली. गिरणीकामगारांना सुट्टींत शिकवून साक्षर करण्याची अमूल्य कामगिरी तिनें

बजावली होती. गरिबाच्या झोपडीपासून तों थेट श्रीमंतांच्या राजवाड्यापर्यंत दयेची देवता म्हणून माणिकुंवरचा लौकिक होता. समाज-सेवा, स्वार्थत्याग आणि स्वावलंबन या तीन सूत्रांवर तिचा स्वावलंबनाश्रम स्थापन केला गेला होता. तिचा सारा वेळ आपल्या आश्रमांतच जात असे. त्रिविक्रम शेटजींना माणिकुंवर घरांतून बाहेर पडतांना थोडेसें वाईट वाटलें. पण पुढें आपल्या अधःपाताच्या मार्गावरील अडथळा आपोआप दूर झाला म्हणून त्यांच्या व्यसनाला कांहीं सुमार राहिला नाहीं.

— २ —

आज माणिकमिलमधें संपाचा वणवा पेटला होता. हातावर पोट भरणाऱ्या मजुरांचे आज कित्येक महिन्यांत पैसे मिळाले नव्हते. शिवाय रात्रपाळीचीहि सक्ती त्यांच्यावर दिनकर दिवाणजींनीं केली होती. पैसे मागावयास कोणी गेला म्हणजे त्याचेवर शिव्यांची बरसात होई. गरीब मजूर सहनशील असले तरी जीवावर प्रसंग बेतला म्हणजे वाघापेक्षांहि क्रूर होतात ते! संपासारखे अमोघ शस्त्र हाताशीं धरल्यामुळें दिनकर दिवाणांचा नक्षा पूर्ण उतरून गेला होता. त्यानें बिगारी मजूर आणून काम करण्याचा प्रयत्न केला, पण तो यशस्वी झाला नाहीं. मगनलाल आणि त्याचे मित्र यांनीं मजूरांना मथविलें, असें समजतांच दिनकर दिवाणजींच्या तळपायाची आग मस्तकाला गेली. मगनलालच्या मागच्या कित्येक बेप-

र्वाईच्या वागणुकीबद्दल तर आपला हा अपमान नसेल ना असें दिवाणजींना वाटूं लागलें. मनुष्य विवेक आणि विचार-भ्रष्ट झाला म्हणजे त्याला कांहीं सुचत नाहीं. दारूच्या निशेंत अहर्निश मग्न असणाऱ्या आपल्या मालकाच्या मनांत त्यानीं वीष कालविलें. मणिकुंवर आणि मगनलाल यांचा कांहीं वाईट संबंध आहे असें त्यानीं मगनलालच्या हस्ताक्षरासारखें अक्षर काढून शेटजींच्या मनांत भरवून दिलें. बिचारा मगनलाल मात्र निष्कारण आपल्या नोकरीला मुकला.

मणिकुंवरला पैशाच्या पाठबळावर आपणांस हवी तशी वळवतां येईल अशी दिवाणजींची अटकळ होती. पण ती सपशेल फसली. मणिकुंवराला मगनलालच्या सहीचें एक पत्र पाठवून त्यानीं तिच्या मनाचा ठाव घेण्याचा प्रयत्न केला. पण त्यांत त्याला यश न मिळतां मणिकुंवरनें त्याची चांगलीच निर्भत्सना केली. सापाच्या शेपटीवर पाय दिल्यानंतर किंवा त्याला दुखविल्यानंतर तो दंश केल्याखेरीज थोडाच रहाणार होता. दिवाणजींनीं एक दुसरेंच कृष्णकारस्थान करण्याचें ठरविलें. दारूच्या नादानें मनुष्य एकदां दिवाणा झाला म्हणजे मग कांहीं विचारावयाची सोय नाहीं. आधींच मर्कट आणि तशांतहि मद्य प्यालेला असला म्हणजे त्याच्या लीला अवर्णनीय असतात. मद्याच्या सेवनानें विषयवासना वाढतात. प्रकृतिप्रमाणेंच पैशाचा चुराडा होतो. समाजांत मानमान्यता मिळत नाहीं. तनमन-

धन यांचा सत्यानाश होऊन मनुष्य मदांध बनतो. मद्यप्यापेक्षां पशुहि शहाणा असतो. दारूचे दूरवरचे दुष्परिणाम मद्यपि माणसाला जाणवत नाहींत असें नाहीं. पण त्याची स्थिति प्रवाहपतिताप्रमाणें असते. दारू तर सोडवत नाहीं आणि दारूचे दुष्परिणाम मात्र सोसावयाची शक्ति नसते त्याला.

या साऱ्या गोष्टी उघड उघड कळत असूनहि दिवाणजींनीं तिकडे डोळेझांक चालविली होती. त्रिविक्रम शेटजींना दारूचें आणि इतर व्यसनें लावण्यास तेच कारणीभूत होते. पैशाच्या आशा आणि आकांक्षा ज्याप्रमाणें सुटत नाहींत त्याचप्रमाणें दारूचें आहे. मनःशांतिसाठीं मनुष्य दारू पितो, पण शांति न मिळतां उलटा मनःस्ताप मात्र त्याला मिळतो. दारूपायीं मनुष्य आंधळा होतो. दिवाणजी असेच मदांध झाले होते. मगनलालसाठीं त्यांनीं संकटाचा खड्डा खणला पण........

— ३ —

सावकाराचा तगादा पाठीमागें लागल्यामुळें शेटजींनीं आपली स्थावर मिळकत विकून एक लाख रुपयांचा बोजा दिनकर दिवाणामार्फत कमी केला. त्याच्या दुसऱ्याच दिवशीं माणिकुंवर एकाएकीं स्वावलंबनाश्रमांतून नाहींशी झाल्याची तापदायक बातमी शेटजींच्या कानांवर आली. दिवाणजींच्या सांगण्यावरून त्यांनीं मगनलालला अटक करविली. पण त्यानें आपली आणि माणिकुंवरची नोकरी-

वरून कमी केल्यापासून पुष्कळ दिवसांत गांठ नसल्याचें सांगितलें. तथापि त्याचें म्हणणें कोणीहि न ऐकतां त्याच्यावर खटला भरला गेला. मगनलाल गरीब असला तरी त्याचे पुष्कळ श्रीमंत मित्र होते. मणिकुंवरच्या माणिकमोलाच्या उपदेशामुळें त्यानें आपल्या जीवनांत उत्क्रांति केली होती.

स्वावलंबनाश्रमाच्या वाढदिवसाची तारीख अगदीं जवळ येऊन ठेपली असतां मणिकुंवरचें एकाएकीं अदृश्य होणें या गोष्टीबद्दल त्याला अतिशय दुःख वाटलें. स्वतःला निष्कारण कैदेंत जावें लागेल म्हणून त्याला विशेष वाईट वाटत नव्हतें. पण आपल्यामुळें मणिकुंवरच्या कीर्तिला काळोखी लागणार असें पाहून त्याला अपरिमित दुःख झालें. अडचणी आल्या कीं आपोआप मार्ग सुचतात त्याप्रमाणें या संकटांतून पार पाडण्यास आपले मित्र बॅरिस्टर विश्राम उपयोगीं पडतील अशी त्याला बळकट आशा वाटली. बॅरिस्टर विश्राम मणिकुंवरचे मित्र होते. ते मगनलालला पूर्णपणें ओळखत होते, इतकेंच नव्हे तर दिवाणजीनीं मुद्दामच मगनलालला अपराध नसतां कमी केलें हें तें जाणून होतें. शिवाय दिवाणजीनीं जे सावकार म्हणून आणले ते संपतराव नवलाखे कर्मधर्मसंयोगानें विश्रामांचें मित्र निघाले. त्यांनींच दीड लाख देऊन त्रिविक्रमशेटजींचा पुष्कळसा बोजा कमी केला ही गोष्ट बॅरिस्टरसाहेबांना माहित होती. मगनलालनें आपल्यावतीनें विश्रामांनाच

वकीलपत्र देण्याचें निश्चित केलें.

खटला सुरू होण्याच्या आदल्या दिवशीं बॅरिस्टर विश्राम यांनीं त्रिविक्रम शेटजींची भेट घेऊन त्यांना सारी हकिगत समजून दिली. बोलतां बोलतां दिवाणजींनीं ज्यांच्याकडून दीड लाख रुपये आणले ते संपतराव नवलाखे आपले जिवलग मित्र असल्याचें त्रिविक्रम शेटजींना सांगितलें. ही बातमी ऐकून शेटजींना अतिशय आश्चर्य वाटलें. कारण दिवाणजींनीं त्यांना दीड लाखांपैकीं अवघा एक लाखच दिला होता. पण बॅरिस्टर विश्रामांनीं त्यांची अशी खात्री पटवून दिल्यामुळें शेटजींना दिवाणजीच्याविषयीं शंका उत्पन्न झाली.

माणिकुंवरच्या खटल्याची तारीख जराशी पुढें ढकलण्याबद्दल त्रिविक्रम शेटजींनीं अर्ज केला होता. कारण दिनकर दिवाणजी खटल्याच्या आधींच कोठें परगांवीं गेला होता. बॅरिस्टर विश्रामांनीं दिनकर दिवाणजींना लिहिलेलीं दोन पत्रें जमा केलीं. मगनलालची खोटी सही दिवाणजींनीं केल्याचें त्यांनीं सिद्ध केलें. पण दिवाणजींचा पत्ता लागेना म्हणून बॅरिस्टर साहेबांनीं आपले मित्र गणपतराव--गुप्त पोलिस--यांची या कामावर नेमणूक केली. गणपतराव यांनीं मोठ्या कौशल्यानें दिनकर दिवाणजीच्या गड्यामार्फत दिवाणजीचा ठावठिकाणा काढून त्यांस अफरातफर आणि कुमारिकेला पळवून नेण्याबद्दल अटक केली. मुद्देमालासकट पकडल्यामुळें दिवाणजींना आपला सारा अपराध कबूल करणें भागच पडलें.

माणिकमिलच्या मुनिमाची जागा आतां मगनलालला देण्यांत आली आहे. माणिकुंवर माणिकमिलची सारी व्यवस्था पहात असल्यामुळें माणिकमिल कर्जाच्या पाशांतून मुक्त झाली आहे. आणि त्रिविक्रम शेटजींचे डोळे मिटण्याचे वेळीं पूर्णपणें उघडले आहेत. इतःपर दारू, शर्यत आणि सट्टा या व्यसनाला आमरण न शिवण्याची त्यांनीं शपथ वाहिली आहे.

— ग. या. नातू, बी. ए. ( ऑनर्स )
[ शंकरसुत ] ( पुणें. )



# १२

## देह आणि मन

एरव्हीं मनुष्य सुखदु:खांच्या साधनांचा जेव्हां विचार करतो तेव्हां खरंच तो किती बारीकसारीक गोष्टीहि लक्षांत घेतो. पण लग्नासारख्या जीवनांतील परिवर्तनक्षणीं मात्र तो जितका अविचार करतो तितका इतर वेळीं क्वचितच करीत असेल ! राहायला तीन मजली इमला, झोंपायला गुढगाभर गादी, आणि हिंडाफिरायला एकादी मोटार असली, की मुलीच्या मनांत येतं, सुख सुख म्हणतात तें याहून दुसरं असं काय असणार ? मुलालाहि वाटतं, की मुलगी दिसायला देखणी आहे ना ? बस्स झालं तर ! नारायणाच्या लक्ष्मींत तरी अधिक असं काय आहे याहुन ?

अशाच कांहींशा कल्पना करून एकत्र आल्यावर, खरं पाहतां तिसरा मजला चढतांना शारदेला केवढी अधीरता आणि आनंद वाटायला हवा होता. पण वस्तुस्थिति मात्र अगदींच वेगळी होती.

आनंदाऐवजीं हृदयांत भीतीचं काहूर माजलं होतं; गात्रं कशीं गळाल्यासारखीं वाटत होतीं; आणि वधस्तंभाकडं खेंचल्या जाणाऱ्या बळीप्रमाणं असहाय्यपणें ती मंद मंद पावलांनीं चालली होती. पतीच्या खोलीचं दार उघडतांना पहिल्या दिवशीं तिचं शरीर कसं बहरलेल्या वेलीप्रमाणं रोमांचांनीं पुलकित झालं होतं. पण आज मात्र तिचा हात दारावरच थबकला. दाराआड कोणतं भयाण दृश्य विधात्यानं रंगवून ठेवलं असेल, याची एक कल्पना तिच्या अंतःचक्षुसमोर नाचून तिला भेडसावीत होती.

कारण, नऊ साडेनऊ झाले तरीहि सारंग जेवायला खालीं आला नाहीं, तेव्हांच तिच्या काळजांत कसं धस्स झालं. वरती जाऊन वेळींच त्याला जेवणाची जाणीव करून द्यावी असं तिला हजारदां वाटलं. पण तिथं जमलेल्या त्याच्या मित्रांच्या सात मजली हास्यानें तिचा विरस कसा क्षणाक्षणाला वाढत होता. शेवटीं जेव्हां रामा गड्यानं मालकाच्या आज्ञेनुसार बिनदिव्याची सायकल घेऊन धूम ठोकली तेव्हां तर तिची खात्रीच झाली !

वास्तविक असले प्रसंग तिला वारंवार पाहावे लागत होते. आणि तिच्या या अंतस्तापानं तिचं मन केव्हांच जळून गेलं होतं. अर्थात आजचा हा प्रसंग म्हणजे राखेला जाळण्यासारखाच होता !

पण जड वस्तु राख झाल्यानंतर जरी पुनः फुलत नसल्या तरी माणसाचं मन मात्र भारी विचित्र आहे. आशेच्या जलानं मनाची

राखसुद्धां अंकुरून येते. शारदेलाहि याचा अनुभव नुकताच येऊं लागला होता. कारण—

दोनतीन दिवसांपूर्वींचीच गोष्ट ! डॉक्टरनीं उपचार करून डोक्याला मलमपट्ट्या बांधल्या तेव्हां कुठं शारदा शुद्धीवर आली होती. डोळे उघडतांच डॉक्टरनीं तिला कांहींसं विचारलं; पण त्याला उत्तर देण्याआधींच तिनं म्हटलं होतं, " ते कुठं आहेत ? "

सारंग उशाशींच उभा होता. तिनं पाहिलं, त्याचाहि चेहरा दुःखीकष्टी दिसत होता. आणि याचं केवढं समाधान वाटलं होतं तिला. आपल्या दुःखानं पति कष्टी व्हावा, याचा कोणा स्त्रीला अभिमान वाटणार नाहीं ? याच आनंदातिशयानें क्षणभर आपल्या जखमा विसरून ती डॉक्टरला म्हणाली, " काय म्हटलंत ? "

तिची हाताची नाडी पाहात डॉक्टर म्हणाले, " नाहीं — आपण जेव्हां जिन्यावरून पडलां तेव्हां तुम्हांला भोंवळ वगैरे आल्यासारखं वाटलं होतं कां ? "

तिला डॉक्टरच्या या प्रश्नाचा अर्थच कळेना. आपण जिन्यावरून पडलों ? तिनं प्रश्नार्थक नजरेनं पतीकडं पाहिलं. तो म्हणाला, " सांग ना — "

मूर्तिमंत असहाय्यता त्याच्या मुखावर प्रगटली होती. निकाल ऐकणाऱ्या खुनी इसमाप्रमाणं त्याचा चेहरा काळवंडला होता. हें पाहून शारदेला काय वाटलं कोण जाणें ! डोळे टिपून ती म्हणाली,

" नाहीं – पायरी चुकून पडलें मी ! "

आणि असं म्हणून तिनं पुनः पतीकडं पाहिलं. सारंग आवंढा मोठ्या प्रयासानं आंवरतांना तिला दिसला. डॉक्टरनीं औषध लिहून दिलं. जातां जातां ते म्हणाले,

" कांहीं घाबरूं नका. दोन दिवसांत बरं वाटेल यांना. "

डॉक्टर निघून गेले मात्र ! सारंग दुःखावेग न आवरतां उद्गारला, " क्षमा कर शारदे — "

" कसली —? "

" तुझ्या पतिभक्तीला पात्र नाहीं मी. "

" असं बोलूं नये वेड्यासारखं— " त्याचा हात आपल्या दोन्हीं हातांत धरून ती म्हणाली, " त्यापेक्षां — "

" काय–? "

" एक वचन द्याल ? "

" हो – बोल – "

" माझी शपथ – ? "

" शपथ, बोल ना – ! "

" पुनः शिवणार नाहीं ना कधीं ? "

सारंगनें क्षणाचाहि विलंब न लावतां शपथ दिली. कारण दारूच्या नशेंत आपल्या हातून केवढं क्रौर्य घडलं होतं, याची त्याला पूर्ण जाणीव होती. निरपराध जीवाला छळणारं त्याचं मन त्याला

डांचत होतं.

आणि हीच एकमेव आशा शारदेच्या हृदयांत अंकुरत होती.

पण व्यसनी माणसाचा पश्चात्ताप क्षणिक असतो हें तिला अनुभवानं कळायचं होतं. कारण, वरील प्रसंगानंतर दुसऱ्या की तिसऱ्याच दिवशीं ती रात्रीं एकाकी जागी झाली, ती पतीच्या पांघरुण घालण्यानं नव्हें; मायेनं अकारण थोपटण्यानं नव्हें किंवा चहाटळपणें कानांत किर्रर्र करण्यानंहि नव्हें; तर अतृप्त राहून अपरात्रीं घरीं परतणाऱ्या पतीच्या दुर्गंधी चुंबनानें !

त्या क्षणींच तिला वाटलं, तडक आपण घराबाहेर पडावं. पण घराच्या तिसऱ्या मजल्यावर ती गुडघाभर गादींत पार बुजून गेली होती. श्रीमंतींत वाढलेल्या तिच्या देहांतील मन पंगू बनलं होतं. घारीच्या पंखांतील पिलानं प्राणांतिक चित्कार करावा त्याप्रमाणं पतीच्या बाहुपाशांत ती उद्गारली — "विसरलांत माझी शपथ?"

या प्रसंगाच्या स्मृतीनं तिच्या डोळ्यांत अश्रू तरारले. पण रडून कुठं नशीब टळतं कां? मनाचा हिय्या करून तिनं दार उघडलं मात्र—

सारंग गादीवर अस्ताव्यस्त पडला होता. त्याचे डोळे तारवटले होते. केंस अस्ताव्यस्त होऊन, एखादी गुळणी आल्यानें त्याच्या सदऱ्याचा उरोभाग भिजून, त्याला असह्य दुर्गंधी येत होती.

शारदेनं मोठ्या प्रयासानं हुंदका आवरला आणि त्याचक्षणीं तिचं

पत्नीत्व संपलं कीं काय कोण जाणें. एकाद्या निढावलेल्या नोकराप्रमाणं ती पुढं झाली. अंथरूण सांवरलं आणि तिनें त्याचा सदरा साफ करीत विचारलें, " पुनः घेतलीत ? "

" हो— घेणार. "

त्यानं तिचा हात झिडकारून दिला. आणि उशाजवळची मोकळी बाटली हातीं घेऊन तो म्हणाला, " आणि उद्यांपासून तूंसुद्धां घेतली पाहिजेस. माझी—पतीची आज्ञा आहे. ये जवळ — आतांच पाजतों तुला—"

शारदेला वाटलं, याहून पत्नीपदाची विटंबना ती कोणती ? याला कारण ? पतीनं आपले मित्र सोडले तर ? ती म्हणाली—

" उद्यांपासून इथं पाय ठेवूं देणार नाहीं मी आपल्या मित्रांना— "

" तूं कोण बोलणार त्यांना ? माझे मित्र आहेत ते — "

" मित्र ? नव्हे शत्रू ! "

सारंगला या वचनांचा मनस्वी संताप आला. तो चवताळून म्हणाला—

" मित्रांना एक शब्द बोल— "

" मी कशाला बोलूं ? नोकरालाच सांगतें— "

" त्यांनीं काय केलंय ग ऽ तुझं ? म्हणें — नोकराला सांगतें नोकर म्हणजे नवरा वाटला काय तुला ? "

*   *   *

आतां शारदेनं तिथं राहण्यांत अर्थ नव्हता. लडिवाळपणें अंगाशीं बिलगणाऱ्या मुलाला त्रस्त मातेनं श्रीमुखांत भडकवावी तशीच कांहींशी अवस्था तिची झाली. तरीहि मुलाचे भरले डोळे पाहून आईला गहिंवर येतो. पण तसं व्हायला सारंग शुद्धीवर होता कुठं ? आणि याचंच शारदेला अधिक दुःख झालं.

ती खालीं आली. पतीचं ताट पार निवून भाताच्या गारगोट्या झाल्या होत्या. आणि हेंच त्या दुबळ्या पतिव्रतेचं नित्याचं पक्वान्न होतं. कसेबसे चार घांस खाऊन शारदेनं हात धुतले, खरकटीं काढलीं, आणि भांड्यांची आवराआवर ती करूं लागली. तोंच रोज सकाळीं भांडीं घासायला येणारी भैना तिला सोप्याचं दार उघडून आंत येतांना दिसली. अशा अवेळीं भैनेला पाहून तिला जरा नवलच वाटलं. ती म्हणाली— " यावेळीं का बरं आलीस भैने ? "

" उद्यांपासनं मी भांड्याला येनार न्हाई. "

शारदेला कमालीचं आश्चर्य वाटलं. रोज न चुकतां येणारी भैनाच कां बोलते आहे हें ? तिनें विचारलें, " कां ग ? "

आणि हा प्रश्न विचारतांना आपल्या मोलकरणी दिवसागणिक बदलतात, याचा विचार तिला बीभत्स वाटला. आपल्या नवऱ्याच्या नादानपणामुळें तर ही जात नसेल, असाहि विचार तिच्या संशयी आणि स्त्रीस्वभावसुलभ मत्सरी मनांत आला. पण भैनेनंच याचं निरसन केलं.

" मी लगीन करतुया"— आणि असं म्हणून भैना लाजली.

भैना विवाहित होती हें शारदेला माहित होतं. अर्थात् भैनेचं हें उत्तर आणि लाजणं पाहून शारदेला हंसूं आलं, तरी त्यांत आश्चर्यच अधिक प्रतिबिंबित झालं होतं. शारदेनं विचारलं, " लग्न झालंय ना तुझं ? "

" याक झालंय जी. "

" मग— ? "

" दुसरं लगीन करतुया म्यां. "

" म्हणजे ? — "

" काडीमोड दिली म्यां नवऱ्याला. आतां पाट लावतुया मी दुसरा. "

पुरुष ' दाढी करतो ' म्हणून सांगतो, तितक्याच सुलभपणें ' मी लग्न करतें, ' म्हणून सांगणारी भैना शारदेला जितकी अपरिचित तितकीच भयंकर वाटली. तरीहि ती शांतपणें म्हणाली, " कां ग— ? "

हा प्रश्न मात्र भैनेला जरा गंभीर वाटला असावा. कारण, थोडा वेळ शांत राहून ती बोलूं लागली, " कालपतुर म्यां तुमास्नी माजा नवरा लई चांगला हाय म्हून बोललें. पन तें सारं अक्षी खोटं हुतं. कारन, उद्यांची आस कुनाला सुटलीया व्हय ? याच आशेनं दारूड्या नवऱ्याचंबी म्यां कौतुक केलं. पण यानंच तो लई भकला

जणूं. कदी कदी घेतों म्हनत नेमानं झिंगू लागला. परवां तर बाईलाच कुटल्या एका घिऊन आला. तवा मातुर माजं डोक्सं फिरलं."

त्यावर शारदा म्हणाली, "तो एक चुकला. पण म्हणून त्याला सांवरायचं, – समजायचं कां — ?"

"सावरासमजायला काय तो प्वार हाय जणूं! गांवाची खेटरं खानारीं बायकांचं ऐकत्यात व्हय?"

भैनेचा हा प्रश्न शारदेच्या जिव्हारीं झोंबला. पण याला उत्तर होतं कुठं? बुडत्यानं काडीचा आधार घ्यावा, त्याप्रमाणं ती म्हणाली, "सीताद्रौपदींचं उदाहरण —"

पण भैनेनं तिला अधिक बोलूंच दिलं नाहीं. ती म्हणाली, "तीं देवमानसं हुती, आणि त्यांचं नवरंबी द्याव हुतं! असं लोळत नव्हतं शेनामुतांत– "

भैनेचा हा सवाल रोखठोक होता. अशा वेळीं पातिव्रत्याच्या आधाराखेरीज हिंदू स्त्री दुसरा कसला आधार शोधणार? शारदा म्हणाली— "वेडे, म्हणून शील कां सोडायचं माणसानं?"

"हे बगा, त्यावरबी म्यां लई इचार केलाया हं! शेवटीं एकच इचारलं मनाला– रातध्यान नवऱ्याच्या नांवानं बोटं मोडून मन इटाळण्यापेक्षां ध्याई इटाळणं लई पाप ठरतं व्हय?"

भैनेच्या या एकेका शब्दासरशीं शारदेच्या हृदयावर वज्राचे आघात होत होते. हा वाद वाढविण्याचंहि धैर्य तिला झालं नाहीं.

शेवटीं भैनाच म्हणाली—"म्यां जाऊं? आतां कंदी येनं हुतंया कुनास ठावं? तवा तुमचा नुसता आशीर्वाद घ्यायला आली व्हते मी. तुमच्यासारख्या देवता—"

आणि एवढें म्हणून भैनेनं तिला नमस्कार केला. शारदेनंहि तिला मनःपूर्वक आशीर्वाद दिला. याचा भाबड्या भैनेला केवढा आनंद वाटला. भैनेला जाणं जिवावर आलं. दारापर्यंत जाईपर्यंत 'जाऊं' म्हणून हजारदां तिनं फिरफिरून विचारलं असेल. आणि शारदा तिला अगदीं अंधारांत विलीन होईपर्यंत पहात होती.

ती दृष्टिआड होतांच शारदा माडीवर गेली. तिचा पति अद्याप अस्ताव्यस्तच होता. त्याला पांघरूण घालण्यासाठीं ती पलंगावर थोडीशी कलली मात्र—

दारूच्या असह्य दुर्गंधीचा भपकारा तिच्या नाकांत शिरतांच भैनेचे शब्द तिच्या हृदयांत केवढ्यानं उमटले—

"रातध्यान मनं इटाळण्यापेक्षां ध्याई इटाळणं लई पाप ठरल व्हय?"

— दिनकर द. पाटील.
( कोल्हापूर )



# १३

## नशीब !

पुढील आठवड्यांत आमचा मॅट्रिकचा निकाल लागणार म्हणून मी व मंदाकिनी त्याची अगदीं आतुरतेनें मार्गप्रतीक्षा करीत होतों. मंदाकिनी ही श्रीमंताची मुलगी होती. तेव्हां तिनें आपल्या मामांना निकाल लागतांच तावडतोब तार करा, म्हणून सांगितलें होतें. माझ्या घरच्या दिवसेंदिवस वाढत चाललेल्या गरिबीमुळें मला अशी कांहींच व्यवस्था करून ठेवतां आली नाहीं. मंदा माझी जिवलग मैत्रीण असल्यानें तिनें माझाहि नंबर मागविला होता. अखेर निकालाचा दिवस एकदांचा उगवला व आम्ही दोघीहि पास झाल्याचें समजलें. माझ्या इतरहि दोन मैत्रीणी पास झाल्याचें समजलें. आम्हाला स्वाभाविकच फार आनंद झाला. त्याप्रित्यर्थ मंदानें मैत्रीणींना थाटाची मेजवानी देण्याचा बेत ठरविला. सकाळीं मेजवानीस यायचे कबूल करून निकाल सांगण्याच्या उत्सुकतेनें

मी घरीं निघून आलें.

घरीं आईलाहि फार आनंद झाला. पण एका गोष्टीनें माझ्या ह्या आनंदावर विरजन पडलें. माझ्या काकांनीं – वडिलांनीं – 'तूं आतां माझ्याजवळ पैसे नसल्यानें शिकायचे बंद कर' म्हणून मला त्याच दिवशीं तंबी दिली. पास झाल्याबद्दल कौतुक करायचें तर राहोच पण उलट असे हे निराशेचे शब्द त्यांचे तोंडून ऐकून मला अतिशय वाईट वाटलें.

आमच्या काकांना अलिकडे दारूची चटक फार लागल्यानें त्यांचें घरीं बिलकूल लक्ष नव्हतें. खर्च दिवसेंदिवस सारखा वाढूं लागला. सावकाराकडे त्यांची ये जा सुरू झाली. त्यांच्या अशा या वर्तनानें घरीं कोणालाच सुख नव्हतें. त्या दिवशीं परीक्षा पास होऊनहि रात्रभर मला झोंप कशी ती आली नाहीं.

दुसरें दिवशीं ठरल्याप्रमाणें सकाळीं आठाला मी मंदाकडे गेले. मंदानें दिवाणखान्यामधील व्यवस्था अत्यंत कसोशीनें केल्यानें चोहों-कडे उत्साह दिसत होता. तेथील मेजवानीचा थाटहि मंदानें आपल्या वैभवाला साजेल असाच केला होता. तिच्या घरीं सर्वजण हंसतमु-खानें तिला मदत करीत होते. मंदाचे वडील दादासाहेब हे निमंत्रित माणसांचे प्रेमानें स्वागत करतांना दिसत होते. घरांत जिकडे तिकडे आनंद वावरतांना दिसत होता. मला एकदम माझ्या घरची आठवण झाली व थोडें वाईटहि वाटलें. कारण याच्या अगदीं उलट वाता-

वरण आमच्या घरांत होतें. पण त्यावेळीं शक्य तो आनंद दाखवायचा मी प्रयत्न केला.

माझे मनांतील ही चलबिचल मंदेनें लगेच ओळखली आणि मेजवानी आटोपून सर्वजण गेल्यावर ती मला म्हणाली, "उषे, आज तूं अशी का? फिस्ट चुकावयाचा तर बेत नाहीं ना तुझा ! तें कांहीं नाहीं मला तर तुझी फिस्ट पाहिजेच बरं का?" 'फीस्ट' हा शब्द ऐकून माझ्या मनांत जास्तच विचारांचे काहूर सुरू झालें. मी तिला 'बरें बरें' एवढेंच सांगून तावडतोब घरीं निघून आलें.

घरीं येते आहें तोंच काकांची स्वारी मदिरा घेऊन आल्याचें मी तावडतोब ताडलें. कारण त्यांचे डोळे अगदीं लाल झाले होते. आणि मुलांना अद्वातद्वा बोलण्यास सुरवात केली. इतकेंच करून गप्प न बसतां दिसेल तें घेऊन त्यांनीं मुलांना मारायलाहि सुरवात केली. आईला तें पहावेना. ती लगेच मुलांना बाजूला घेण्याचा प्रयत्न करूं लागली. मी हें सर्व उभें राहून पहात होतें. त्यांनीं आईच्या अंगावर पण काठी उगारली. तें पाहतांच मी धांवून गेले, पण आईचा मार चुकून तो माझ्या डोक्यांत बसला. मी पटकन् खालींच बसलें. यापुढें काय झालें तें मला आठवत नाहीं.

असे प्रसंग घरीं वरचेवर येत असल्यानें माझेंच काय पण सर्वांचें मन अगदीं विटून गेलें होतें. आजपर्यंत या नादांत काकांनीं,

आमच्या आजोबांनीं मिळून ठेवलेली सर्व संपत्ति नाहींशी करीत आणली होती.

सध्यां आमच्या घरांत अशी स्थिती आली कीं पुरेसे वस्त्र आणि पोटभर अन्नहि मिळायची आम्हांला पंचाईत. मंदेची व तिच्या घरच्या मंडळींची आठवण झाली कीं मला माझ्या स्थिती-बद्दल जास्तच वाईट वाटे. मंदा नशीबवान म्हणूनच तिला असले प्रेमळ व श्रीमंत आईबाप लाभले होते. सर्व बाजूंनीं तिला सुख मिळत होतें. पण मला कोणत्याहि बाबतींत सुखाची नुसती कल्पना-सुद्धां नव्हती. मंदेला फीस्ट द्यावयाची कबूल करून तिला कपभर दूध द्यायचें पण मला सामर्थ्य नव्हतें. मंदा आतां उच्च शिक्षणासाठीं कॉलेजमध्यें जाईल आणि मी ? मी घरीं राहून रोज कांकांचे पराक्रम पहात बसणार ! दुसरें काय ? माझ्या स्थितिबद्दल मी कोणाला दोष देऊं ? माझा अपराध कोणता ? शेवटीं नशीबालाच दोष लावून आज तरी मी स्वस्थ बसलें आहे !

माझ्या शेजारीं मंजुळा म्हणून एक शेतकऱ्याची मुलगी आहे. ती अजून थोडी लहानच आहे, पण नेहमीं कशी आनंदांत असते. तिचे आईबाप रोज उन्हातान्हांत काबाडकष्ट करीत असतात. तीहि त्यांचे बरोबर शेताला जाते. पण कोणी दुःखी दिसत नाहीं. मंजुळेची दोन भावंडें व आईबाप सतत समाधानांत असलेले दिसतात. मंजुळा अशिक्षित मुलगी, पण मला ती माझेपेक्षां नशीबवान वाटते. तिला

जवळ घेऊन प्रेमानें पाठीवर हात फिरवितांना तिच्या बापाचा आनंदी चेहरा मला रोज दिसतो. तिच्या आईबापांतहि केव्हां केव्हां भांडण होतें. पण तें किती प्रेमळपणाचें असतें ? त्या भांडणाचें चिन्ह एका क्षणानंतर दिसतहि नाहीं.

आमचे काकाहि किती किती चांगले होते ! आरंभाला मीहि स्वतःला मंदाप्रमाणेंच नशीबवान समजत होतें. पण ते अक्काबाईच्या फेऱ्यांत सांपडल्यापासून माझे नशीबहि फिरलें. त्यांची त्यांनाच जाणीव रहात नाहीं तर मग इतरांची काय कथा ? हेंहि एकप्रकारचें नशीबच नाहीं तर काय ?

— कु. सरोजिनी कृष्णराव बाबर.

( अहमदनगर )



# १४

## दुष्ट राक्षसीण

आज सकाळपासून म्हातारीच्या डोळ्याचें पाणी कांहीं आटलें नव्हतें. सकाळींच तिला जी ‘ कुणकुण ’ लागली, तिचा तर हा परिणाम नसेलना ? तिच्या डोळ्यापुढें आज मागील वैभवाचीं ताप दायक दृश्यें — हो, तापदायकच नव्हेत तर काय ? मागील वैभवाची आजच्या भयाण परिस्थितीशीं तुलना करतां, तीं मानवी स्वभावानुसार जास्तच दुःखाला कारणीभूत होणारीं नव्हेत काय ? एक एक आठवण होऊं लागली कीं, म्हातारीचें हृदय जास्तच भरून येई. पूर्वीची ती पंधरा—वीस बिघे चांगली पिकाऊ जमीन, बागायत मळा, मळ्यांतील ती भली मोठी बांधीव विहीर, उसाचा फड, केळीची बाग, डौलानें डोलणारीं तीं आंब्याचीं झाडें, वैभव विशेष उंच करून दाखविणारीं तीं नारळीचीं झाडें, दावणीचे ते खिलारी पुष्ट बैल, त्या दुभत्या गाईम्हशी, घरांत जिकडे तिकडे भरलेला दाणागोटा, राबणारी

ती गडीमाणसें-हीं सगळीं दृष्टीपुढें उभीं राहून म्हातारीचें हृदय जास्तच भरून आलें होतें. त्यांतल्यात्यांत आज सकाळीं तिला जी बातमी कळली होती, तिच्यायोगानें तर तिचें हळवें हृदय फाटत होतें.

आशा ही माणसाच्या गत दु:खाला विरजण घालीत असते. मनुष्य निव्वळ आशेच्या जोरावरहि जगूं शकतो म्हणतात, पण ती आशाच खुंटली तर? आशेचा मनोरा ज्या भक्कम पायावर उभारला जायचा तो पायाच उखणला तर? मग त्या मनोऱ्याबरोबर माणसाचे सुखदायक मनोराज्य-हि जमिनदोस्तच होणार! म्हातारीला वाटे—झालें ते सगळें गेलें. पण एवढी दोन बिघे जमीन राहिली आणि एवढें घर राहिलें, तरीसुद्धां माझी सूनबाई कोंड्याचा मांडा करून कसे तरी दिवस काढील. आणि त्यांतूनहि माझ्या दिलीपला सुखाचे दिवस दाखवील. पण ती बातमी खरी ठरली तर?....

× × ×

" आजी, आजी! तूं सालखी सालखी का ग ललतेस? दादा तुला लागे भलले होय? आजी, लडू नकोस. आजी, तुला गोल गोल पापा देऊं का?" असें म्हणून दिलीपनें आपल्या दोन्ही हातांचे तळवे त्या प्रेमळ म्हातारीच्या भक्कड गालावर ठेऊन लडि-वाळपणानें तिच्या तोंडांत तोंड घातलें. यावेळची म्हातारीची स्थिती पूर्णपणें वर्णन करण्यास कोणाहि लेखकाची लेखणी असमर्थच ठरेल.

कारुण्य आणि वात्सल्य यांच्या योगानें त्या माऊलीस जास्तच भड-भडून आलें. तिनें त्या बाळास हृदयाशीं घट्ट धरून अश्रूंनीं न्हाणिलें.

हृदयाचा कढ बराच ओसरल्यावर रुद्ध कंठानें ती म्हणाली, "बाळा, कशालारे तूं येथें जन्माला आलास ? एथें तुझें काय कोडकौतुक होणार ! बाळा तुझ्या वडिलानें तुला काय ठेविलें आहे ! घरदार का जमीन ? कांहीं नाहीं ! देवा, माझ्या रंगूला कसलीरे बुद्धि दिलीस ? अगोदर माझा रंगू वाईट का होता ? किती सालस पोरगा ! अगदीं माझ्या अर्ध्या वचनांत राह्यचा. कधीं माझ्या सांगण्याबाहेर जायचा नाहीं. पण संगत नडली ! त्या संगतीनंच सर्वस्वी घात झाला. बाळा, तूं जन्मण्याआधींच माझे डोळे कारे झांकले नाहींत. बाळा ! बाळा ! ! " पुढें म्हातारीच्यानें बोलवेना.

"पण तुम्हीच असं करूं लागल्यावर दुसऱ्यांनीं कसं करावं बरं ? तुम्हीं सांगायच्या सवरायच्या, धीर द्यायच्या. त्या तुम्हींच असं करूं लागला तर माझ्यासारखीची काय बरं स्थिती होईल ? मग मी काय करावं बरं ? " असें म्हणून हिराबाईहि अश्रू ढाळीत उभी राहिली.

"नाहीं ग सूनबाई " दिलीपला खालीं सोडीत म्हातारी म्हणाली, " तुझ्यासारखी साध्वी सून मिळाली याचा मला भारीच अभिमान वाटतो बघ. माझ्या रंगूच्या विपत्काळीं तूंच त्याला चांगली मदत करशील याची मला खात्री आहे ग. पण मुली, तुझ्या बापानं भरपूर हुंडा दिला. अन् वाटेल तितकी करणी धरणी केली. पण बाई ! त्या

मानानं माझ्या रंगूकडून तुला सुख मात्र मिळालं नाहीं !...."

म्हातारीचें बोलणें संपण्यापूर्वीच हिराबाई म्हणाली, " असं कसं म्हणतां आत्या ? मला सुख न मिळायला काय झालं ? पोटच्या मुलीवर प्रेम करतात तसलं वात्सल्य प्रेम करणाऱ्या तुमच्या सारख्या सात्त्विक सासूबाई देवानं दिल्यावर माझ्या सुखाला काय कमी आहे ? तुमच्या कृपाछत्राखालीं मला कांहींसुद्धां कमी नाहीं बरं कां ! "

" काय कमी आहे म्हणतेस ? काय आहे बाई ! आंगावर सोन्याचा मणी नाहीं कीं, आंगभर चांगलं वस्त्र नाहीं. घरांत महिन्याभराची चंदी सुद्धां नाहीं ! माझ्या दिलीपला तरी.... "

" असूं द्या. उठा आतां. तिसरा प्रहर व्हायला आला ! नेहमींच काय अशी परिस्थिती राहतीया ? उद्यां त्यांच्या वागणूकींत बदल होईल नि सर्व कांहीं सुरळीत चालेल. उठा. न्हाणींत मी पाणी आणून ठेवलंय. उठा म्हणते ना ? "

" माझ्या रंगूच्या वागणूकींत बदल होईल ? तुझ्या तोंडानं देवीच बोलते ग ! आई, अंबाबाई ! माझ्या रंगूला चांगली बुद्धि दे ग ! सात मंगळवारीं खणानारळानं तुझी ओटी भरीन–" असें म्हातारी गद्गद स्वरांत म्हणाली आणि उभे राहून देवीच्या नांवानें तिनें नमस्कार केला.

× × ×

" रंगू, असें कायरे करतोस बाबा ! अरे, एवढें तरी भांडें घरांत

राहूं दे रे ! अरे, आंघोळीला पाणी तरी कशांत तापवावें ? एवढं तपेलं घरांत असूं दे बाबा ! घरांत भांड्याच्या उतरंडी कीरे होत्या ! तुझ्या वडिलांना भांड्याचा किती नाद ! कितीतरी भांडीं त्यांनीं आणिलीं होतीं. पण तीं सगळीं कीरे कुणाच्या मढ्यावर नेऊन घातलींस ! आतां एवढं तपेलं तरी नेऊं नको बाबा ! रंगू, मी तुझ्यापुढं ह्मणून घेईन बघ ! ठेव तपेलं खालीं."

रंगू पाटलानें थोडीशी घेतल्यामुळें त्याचे डोळे तारवटले होते. तोंडाची बोबडी वळली होती. चालतांना सारखे तोल जात होते. एवढी निशा आली होती तरी रंगू पाटलास पुरेशी वाटली नाहीं. आतांशा कलालाकडे त्याची पत चालत नसल्यानें त्याला आतांच्या आतां घरांतील कांहीं जिन्नस पाहिजे होता. म्हणून त्यानें घरांतील एकुलत्या एक तपेल्यास हात घातला होता.

"काय म्हणालीस थेरडे ? दम धर मी तुला दगड आणून देतों. घे त्यावर डोकं आपटून !" असें म्हणून रंगू पाटील झोकांड्या खात आंगणांत गेला. आणि तेथील एक हलकासा दगड उचलण्याचा प्रयत्न करूं लागला; तों तोल जाऊन धाडकन् तेथें पडला. तिथं एक लोळण घेऊन पुन्हां तो उठला, व तो दगड घेऊन ओटीवर आला; आणि म्हणाला, "घे हा दगड ! आपट यावर डोकं ! नाहींतर दम धर, मीच तुझ्या टाळक्यांत घालतों !" असें म्हणून दगड

डोकीवर घेऊन म्हातारीकडे धांवला.

" बरं झालं गुलामा, घाल माझ्या डोकींत दगड! एकदांची मोकळी तरी होईन! नकोत हीं डोळ्याचीं पारणीं फेडून घ्यायला!! " असें म्हणून म्हातारीहि पुढें सरली. तों " हां हां! असं करूं नका!" असें म्हणून हिराबाईनें म्हातारीस मागें ओढली.

" पोरी! कशाला ग मला आवरतेस ? होऊं दे एकदां ह्या कटकटीतनं मोकळी! "

रंगू पाटील हास्य करीत म्हणाला, " काय पण दोघींची गंमत चाललीया! तुम्हीं नाहींना मला तपेलं देत ? तर मीच तुमच्या पुढं डोकें फोडून घेतो. " असें म्हणून खरोखरच त्यानें त्या दगडा-वर डोके आपटलें. झालें! कपाळास खोक पडून त्यांतून भळभळ रक्त वाहूं लागलें.

तें विपरीत दृश्य पाहतांच मातृहृदय आणि पत्निहृदय तावडतोड कळवळलें. त्या दोघीहि चटकन् त्याच्याजवळ धांवल्या. म्हातारीनें त्वरीत कपाळावर हात दाबून धरला आणि म्हणाली, " असं करूं नको बाबा! माझ्या टाळकींत दगड घाल, पण असं करूं नकोस. तुला देतें बरं तपेलं. माझ्या बाबावरनं तपेलं ओवाळणी जाऊं दे. पोरी, देग माझ्या बाबाला तें तपेलं आणून. "

हिराबाईनें ताबडतोब तपेलें तेथें आणून ठेविलें!

" हां ऽ ऽ! आतां कशा भ्याल्या! आतां कसं तेपंल दिलं!"

असें म्हणून तें तपेलें घेऊन झोकांड्या खात तो वाड्याबाहेर पडला.

तो बाहेर गेल्यावर तें मातृहृदय आणि पत्निहृदय डोळ्यांतील अश्रूंच्या रूपानें बराच वेळ पाझरत होतें.

× × ×

दारूला द्यायला घरांत आतां कांहीं राहिलेंच नव्हतें. कित्येक वेळा चूलहि पेटवायची पंचाईत पडूं लागली. अर्थात् रंगू पाटलाचें दारूचें व्यसन आतां साहजिकच कमी झालेलें होतें. कोणी एखाद्यानें दिलीच तर मधून मधून चाललेंच होतें. पण आतां पुढील भवितव्यता त्याच्या दृष्टीपुढें थैमान घालूं लागली होती. आपलें पुढें कसें होणार ही विवंचना त्याच्या मनाला झोंबूं लागली होती. आज सकाळपासून तर त्याला या विचारानें फारच भंडावलें होतें. मनस्ताप नाहींसा करण्यास कोणी दाता भेटला तर पहावा म्हणून रंगू पाटील घराबाहेर पडला. त्याच्या नशिबानें त्याचा एक जुना दोस्त त्याला भेटला, आणि त्यानें रंगू पाटलास खूपच पाजली. रंगू पाटील तर्र होऊन झोकांड्या खात घरीं चालला होता.

त्याच्यापुढेंच थोड्या अंतरावर एक मांग " रंगू पाटलाच्या घराचा जमिनीचा लिलाव मेच्या चौदा तारखेला चावडींत होणार हाय. कुणाला घयाचा असल तेनं त्या दिवशीं चावडींत हजर व्हावावंऽऽ ! " असें मोठ्यानें म्हणत व " ढिम्, ढिम्, ढिम् " टिमकी वाजवीत चालला होता. रंगू पाटलाच्या घराशेजारीहि त्यानें पुकार केला व

टिमकी वाजविली. म्हातारीच्या कानांवर टिमकीचा आवाज जातांच "मी ऐकलेल्या बातमीची तर टिमकी वाजत नसेल ना ?" अशी एक अंधुक शंका तिच्या मनाला चाटून गेली, आणि ती लगबगीनेंच दरवाज्यांत गेली. तेथें रस्त्यावर तिला मांग दिसला. त्याला ती म्हणाली, "कायरे भिवा, कुणाचं काय हाय ?" भिवा नुसता हंसला आणि दहापांच पाऊलें थोडेसें पुढें जाऊन त्यानें तसाच पुकार करून टिमकी वाजविली.

आधींच काळजीनें पोखरलेल्या म्हातारीच्या हृदयाला त्या ऐकण्यानें एकदम धक्का बसला. म्हातारीला चटकन् घेरी आली, आणि ती धाडकन् दरवाज्यांतच पडली. तोंडाला बुडबुडा आला, अन् तिनें कायमचे डोळे मिटले.

हिराबाईनें बाहेर काय वाजलें म्हणून पाहिलें तों तिला तें दृश्य दिसलें. ती धांवतच गेली आणि तिनें म्हातारीच्या गळ्यास मिठी मारून हंबरडा फोडला. "आत्याबाई, हें काय केलंत हो ! आत्त्या, आतां मला कोण आहे हो ! तुम्ही मला आईच्या ठिकाणीं किहो होता ! आत्त्या, माझ्याबरोबर एकदां बोला तरी हो ! आत्त्या ! आत्त्या !" असा ती आक्रोश करूं लागली. इतक्यांत झोकांड्या खात रंगू पाटीलहि बाहेरून आला. त्याला तें भयंकर दृश्य दिसतांच त्याची निशा ताबडतोब उतरली. त्यानें एकदम आईच्या तोंडांत तोंड घालून रडायला सुरवात केली. "आई ! माझ्यावर रागावलीस होय !



९

आई, या दुष्टाला या पाप्याला सोडून गेलीस होय ! आई, तुझी प्रेमळ मूर्ति आतां मला कुठं ग दिसणार ! आई, एकदां माझ्याशीं बोल ग ? आई, तुझ्या दिलीपानं सारखा टाहो फोडला आहे ना ! त्याला रोजच्या सारखा एकदां कुरवाळ ग ! आई, त्याच्याबरोबर तरी एकदां बोल ! आई ! आई ! !

"आई, मी तुझे अनंत अपराध केले आहेत. आई मी तुला किती तरी त्रास दिला ! पण आई, हें सगळं त्या दुष्ट राक्षसिणीमुळं झालं. आई, ही दारू म्हणजे दुष्ट राक्षसीण आहे, हें मला आतां चांगलें कळलें. आई, दारूनंच मला माणसातनं उठवलं आणि दारूमुळंच तूं आज मला मुकलीस ! आई, जगांतल्या खऱ्या प्रेमाला आज मी अंतरलों ग ! आई ! आई ! !

— **रावजी संताजी शिंदे**, ताकारीकर.
( कामेरी—सातारा )



## १५

# त्याचें ध्येय

मॅट्रिक झाल्याबरोबर सदानंदानें पोलिसची नोकरी धरली. पुढचीं कॉलेजचीं चार वर्षें म्हणजे आयुष्यांतला स्वर्ग — अन् त्याची त्याला ओढ नव्हती असें नव्हे ! पण पैशाशिवाय हें स्वर्गसुख तरी कसें मिळणार ? म्हणून त्यानें तो नाद सोडला. आणि दुसरे म्हणजे बी. ए., एम्. ए. होऊन शेळपट मास्तरकी करण्याबद्दल त्याला पहिल्यापासूनच तिटकारा होता. आपण मोठे अधिकारी — विशेषतः फौजदारच व्हावें असें त्याला अगदीं मनापासून वाटत होतें. अन् केवळ त्याच ध्येयानें प्रेरित होऊन तो पोलीस झाला होता. त्याचें पीळदार सुंदर शरीर, त्याच नोकरीला तो योग्य आहे; हें जणूं ओरडून सांगत होतें.

तो पोलीस झाला तेव्हां कितीतरी लोक त्याला म्हणाले, ' पोलीसची नोकरी फार वाईट ! ' तें ऐकलें कीं तो म्हणायचा, ' पोलीसची नोकरी वाईट कशी ? कोणत्याच नोकरीला वाईट म्हणतां

यायचं नाहीं. आतां तींत पडणारीं माणसं वाईट असलीं म्हणून नोकरीला वाईट कसं म्हणतां येईल ? '

पोलीसच्या नोकरींत उत्कर्ष जसा भराभर होतो तशीं व्यसनेंहि पण ताबडतोब जडतात हें त्याला माहीत होतें ! अन् असं असूनहि आपण निर्व्यसनीच राहून एकेक अधिकाराच्या जागा मिळवित मिळवित फौजदारच काय पण डी. एस्. पी. सुद्धां होऊं — या महत्त्वाकांक्षेनें सदानंद पोलीस झाला होता !

पण मनानं तयार केलेलं लोणी व्यवहाराच्या आंचेनं ताबडतोब वितळावं हा सृष्टीचा नियमच आहे जणूं !

पहिले कांहीं दिवस त्याचे चांगले गेले. पण दिवसभरच्या खड्या पहाऱ्यानें संध्याकाळीं त्याला अगदीं गळून गेल्यासारखें होत असे. अन् कामाची कधींच संवय नसल्यामुळें तो त्रास त्याला असह्य होई !

आणि एके दिवशीं तर त्याला अधिकच ताप झाला. तो कामावरून सुटला त्यावेळीं शरिराचीं सगळीं गात्रें शिथिल झाल्यासारखीं त्याला वाटलीं. खोलींपर्यंत चालत जाणंसुद्धां त्याच्या जिवावर आलें. कशींबशीं पावलं टाकीत तो हळूहळू निघाला होता. अन् त्याची ती गलितगात्र स्थिति त्याच्या मित्रांना मात्र अतिशय मोलाची वाटली. रोजरोज ते त्याला एका गोष्टीबद्दल आग्रह करीत होते, पण तो त्यांना दाद देत नव्हता. आज तो तसं म्हणणं शक्यच नाहीं, या खात्रीनें ते त्याच्याजवळ आले अन् त्याला गराडा घालून म्हणाले,

‘ दोस्त, आज आम्हीं तुला सोडणार नाहीं ! ’

‘ कां ? ’

‘ तुझी ही स्थिति बघून आम्हांला कींव येते. तूं आजचा एकच दिवस आमच्येबरोबर ये अन् मग सांग, आमचा आग्रह बरोबर आहे कीं चूक तें ? ’

तो भानावर येऊन म्हणाला, ‘ म्हणजे तुम्ही मला दारू पाजणार कीं काय ? ’

‘ छट्, दारूचें नांव काढूं नकोस. परमेश्वरानें या जगांत असं एक पेय निर्माण केलेलं आहे कीं, त्यानें सगळ्या श्रमाचा परिहार एका क्षणांत होऊन माणूस ताजातवाना व्हावा ! ’

इतर अनेकवेळीं त्या मित्रांनीं तशी भाषा वापरली होती. पण त्या त्या वेळीं त्यानें त्यांना धुडकावून लावलें होतें. आज ती शक्तिच नव्हती त्याच्यांत. खात्री करून घेण्यासाठीं विचारावें म्हणून तो म्हणाला, ‘ खरं म्हणतां कीं काय ? ’

‘ अगदीं खरं ! ’ त्यांनीं एकच गिल्ला केला.

नकळत सदानंदाचे पाय त्यांच्या मागोमाग चालूं लागले.

आणि त्या ठराविक दुकानांत गेल्यावर, तो विशिष्ट पेयाचा पेला समोर पाहिल्याबरोबर तो एकदम दचकला. त्याला त्या क्षणीं वाटलं, इथून पळून जावं. पण तें त्यावेळीं तरी अशक्य झालं.

डोळे झाकून त्यानें तें पेय घेतलें.

आणि काय चमत्कार झाला कुणास ठाऊक ! त्यावेळेपुरता तरी त्याला खरंच उत्साह वाटला. त्याचें श्रम हलके झाल्यासारखें वाटलें.

तो घरीं आला त्यावेळीं त्याला आज आपण चुकलों, असं मनापासून वाटलं. त्या पेयानें श्रम हलके झाले असलें अन् खिशाला जरादेखील चाट बसली नसलीं तरी तो मनाशीं म्हणाला, 'दारू पिणं हें वाईट आहे. उद्यांपासून हें बंद करायलाच पाहिजे !'

असा त्यानें निश्चय केला.

पण वाळूच्या पायावर बांधलेल्या इमारती किती दिवस टिकतात ?

दुसऱ्या दिवशींच एक प्रसंग घडला. त्यानें एका ड्रायव्हरला आडवलं. ड्रायव्हर म्हणजे जगांतला पक्का बनेल माणूस ! त्यानें दोन रुपये सदानंदाच्या हातांत ठेवले. आणि सराईत दोस्ताप्रमाणें त्याचा हात हातांत घेऊन तो दारूच्या दुकानांत शिरला. सदानंदाचें विचारचक्र सुरूं व्हायच्या आंतच दारूचा प्याला त्याच्या हातांत आला. शिणलेल्या शरिरासाठीं हातांनीं तें काम तावडतोब आटोपलें. ड्रायव्हरनें आग्रह करून आणखी एक प्याला त्यास पाजला.

त्या दिवशींहि सदानंदानें पुष्कळ विचार केला. पण रात्रीं विचार अन् दिवसा फुकट मिळाली कीं दारू पिणं—हें जणूं ठरल्यासारखेंच झालें.

पण व्यसनं हीं फुकट लागलीं तरी तीं पुढं अतिशयच महाग पडतात, हा अनुभव कुणाला नाहीं ? महिन्याकांठीं पगाराचे सगळे

पैसे त्याचे दारूसाठीं खर्च होऊं लागले. आणि इतर खर्च उसनवारीनेंच भागवावा लागे. पण तें किती दिवस चालणार ?

*　　　　*　　　　*

संपली त्याच्या ध्येयाची गोष्ट ! त्याचं पीळदार शरीर रोगाचं माहेरघर बनलं ! नोकरीची शाश्वती राहिली नाहीं. अन् दारूच्या बाबतींत तर तो ध्येयहीन पशूच बनला आहे !

— **मल्हार भाऊराव भोसले.**

( भिलवडी–सातारा )



# १६

## शरद्ऋतूंतील मेघांनो !

‘ बापू ’

हांक आली त्या दिशेला बापूनें मान वळवली. तो एकदम चमकला.

‘ बापू इकडे ये ’

फिरून असे शब्द येतांच गुत्त्याच्या दारांत उभ्या असलेल्या बापूनें बाहेरचा रस्ता सुधारला.

‘ ओळखलेस तूं मला ? ’

बापूनें त्या नेहरू सदरा, खादीची विजार घातलेल्या चापचोपून डोक्याचे केंस मागें सारलेल्या शेजाऱ्याकडे पाहिलें. आपल्या मळाचीं पुटें चढलेल्या कोटावरून, नेसत्या जाडीभरडी कळकट पंचावरून नजर फिरवली.

जरा वेळानें शरमून तो म्हणाला,

' काळे ना तुम्हीं ! मॅट्रिकला पुण्याला तुम्ही आम्ही एका वर्गांत....'

' हां हां बरोबर .... किती विद्यार्थ्यांचा आवडता होतास रे तूं ! साऱ्यांना तुझें घरचें नांव माहिती ! '

' हंः ' बापूनें निःश्वास टाकला. जुन्या आठवणी त्याला वेदना देत होत्या.

' तूं हें काय करतोस ? ताडीगुत्ता.... '

' काळे, पोटासाठीं रोज गिरणीचा सांचा चालवणें माझ्यासारख्या पांढरपेशाला सोपें नाहीं. आठा दिवसांनीं रात्रपाळी बदलते. पण आमच्या कुठले कपाळीं तेवढें तरी सुख ! मॅनेजरचा कुणी नातलग आहे ना त्याला सततची दिवसपाळी मिळावी यासाठीं आमचे रात्रीचें काम कायम. '

' अरेरे ! मॅट्रिक झालेल्या इसमाची कोण ही दशा—'

काळे यांनीं परीटघडीचा खादीचा रुमाल आपल्या डोळ्याजवळ एकदोनदां नेत म्हटलें.

' काय किंमत आहे काळे मॅट्रिकला ? जिथें बी. ए., एम्. ए. भीका मागताहेत .... मी बोलून चालून मजुराचा पेशा पत्करला आहे. माझें कांहींहि होवो .... माझ्या बहिणीचें लग्न तेवढें झालें.... अशा काळजा जिवाला डसताहेत .... त्या विसरायला .... ' बापूनें दारूगुत्त्याकडे बघितलें.

'मी कामगारांची संघटना करतो आहे. तुझा पत्ता दे. भेटेन कधींतरी.'

देशभक्त काळे निघून गेले.

बापूला आपल्या पूर्वीच्या जीविताचें स्मरण झालें. पीठ्यावर जायची त्याची त्यालाच लाज वाटली. त्याच्या हातावर पाण्याचे थेंब पडले. क्षणभर त्याला वाटलें पाऊस कोसळूं लागण्याचें हें चिन्ह असावें.

पण छे—त्याच्या डोळ्यावाटे ती आंसवें गळलेलीं होतीं.

× × ×

दे. भ. काळे बापूच्या चाळींतील खोलींत एकदां गेले. बापूची उपवर बहीण नजरेस पडल्यावर देशभक्त महाशयांच्या खेपा वाढत चालल्या.

मुंबईंत तीन-चार ठिकाणीं दाखवून हुंड्याच्या पैशामुळें जुळत नाहीं असें ठरतांच बापूनें बहिणीला पुण्यास आजोळीं पाठवलें.

दे. भ. काळ्यांनीं बापूवर बरीच छब पाडली. भाषणें, दौरे, स्वच्छ पोषाख, सात्त्विक वागणूक....

— गिरणींत बापूनें सुताच्या गांठी सोडवण्यापासून उमेदवारी केली होती. त्याच्या बरेच कामकरी ओळखीचे होते. सांचे चालवतांना आसपासच्या कुणाला तहान लागली, कुणी उभे राहून राहून थकले तर आपला सांचा संभाळून त्यांचे तुटलेले कापसाचे धागे तो सांधी. अविश्रांत कष्ट उपसून दमल्यावर आपल्यासारख्याच कांहीं

सडाफटिंग संवगड्याबरोबर तो ताडीपान करूं लागला होता.

अलीकडे त्याचें व्यसन पुष्कळसें हटलें. दे. भ. काळे यांच्या संगतींत त्याचा थोडासा वेळ जाऊं लागला.

एकदां दे. भ. काळे यांचा मित्र काळ्यांच्या समक्षच बापूला थट्टेच्या सुरांत बोलला,

' संभाळा बुवा ! या काळ्याचे आजोबा मोठे बडे प्रस्थ होते. गडगंज पैसा कमावला पण दारूचा नाद. एकदां ही बाटलाबाई घरांत घुसली कीं तीन तीन पिढ्या घर सोडीत नाहीं. हा काळे तर आमच्या देखतच........'

त्याच दिवशीं काळे बापूला म्हणाले,

' मी तुझा मेव्हणा होणार हे खपत नाहीं यांना, म्हणून कांहींच्या बाहीच भकतात........'

बापूला कोण आनंद झाला काळ्याचे उद्गार ऐकून.

स्पष्ट स्पष्ट लग्नाची कबुली दिलीन् काळ्यांनी........

बापू लगेच मुहूर्तसुद्धां ठरवणार होता पण पुन्हा त्याला वाटलें–' नको. वेळ येईल तसतसे काळ्यांच्या तोंडानेंच काय ते ठरूं दे.'

बाकी आपल्या स्थितीच्या हीनत्वामुळें बापू इतक्या दिवस जो प्रश्न विचारायला धजावत नव्हता त्याचेच आपोआप मनाजोगें उत्तर मिळालें. तूर्त हें समाधान कांहीं लहानसहान नव्हतें !

बस्........बापूच्या चेहऱ्यावरील चिन्तेच्या प्रवाहांना आतां तिथें

राहण्याची काय जरूर होती ? त्याची दारू तर हलके हलके सुटत चाललीच होती.

काळेसारखा चतुर वक्ता, दुसऱ्यांना व्यसनें सोडण्याचा उपदेश करतो त्याअर्थी स्वतः निर्व्यसनी, पैसेवाला मेव्हणा मिळणार........

बापू या कल्पनेनें एवढा धुंद झाला कीं कांहीं दिवसांनीं त्याच्या आजोळची बहिणीचें लग्न तांतडीनें ठरल्याची तार थडकली तशी ती घेऊन तो धांवतच दे. भ. काळे यांना शोधीत निघाला.

त्याच्या मनांत सदर लग्न मोडून त्याच मुहूर्तावर दे. भ. काळे यांना मेव्हणा करावे असें होतें.

काळे यांना शोधता शोधता काळोख पसरला. आणि ते कुठें दौऱ्याला गेल्याचेंहि समजलें.

मध्यरात्रींची वेळ.......बोरीबंदर स्टेशनवर गाडी निघायचा ऐन सुमार—

चट्कन हाताशीं लागलेल्या डब्यांत बापू चढला.

—गाडी सुरूं होतांच त्याच्या ध्यानांत आलें कीं मजुरांचा, हमालांचा ज्या डब्याशीं केवळ कुणाचें ओझें ठेवण्यानेण्यापुरताच कधीं संबंध आला तर येतो, असा हा दुसऱ्या वर्गाचा डबा आहे—

परंतु........

बहिणीचें ठरलेलें लग्न रद्द करायचें हा एकच विचार—

दे. भ. काळे यांनी रुकार दिला आहे.......ते रागावतील........

आपल्याहि हातचे सत्पात्र स्थळ जाईल........आपली बहीण ऐश्वर्याला मुकेल........ही बापूची तळमळ !

डब्यातले दिवे बंद होते. बापू मुकाट्यानें वरच्या बर्थवर चढून निजला.

दादरला दोन खादीचे अभ्रे पेहरलेल्या व्यक्ती त्याच डब्यांत शिरल्या. अन् त्यांच्या बेसुमार बरळण्यानें—मादक हास्य विनोदानें बापूची झोंप उडाली.

त्यानें सहज पाहिलें.

बापूचा स्वतःच्या दृष्टीवर विश्वास बसेना.

दे. भ. काळे यांच्या प्रणयचेष्टा ! दे. भ. काळे यांचें दारू सेवन ! !

रागाच्या आवेशांत त्यानें बर्थवरून खालीं उडी मारली.

सुदैवानें स्टेशन आल्यानें फार बाचाबाची होण्याचें टळलें. कुणालाच सांखळी ओढण्याची गरज उत्पन्न झाली नाहीं.

काळ्यांच्याकडे क्रूर नजरेनें पाहात स्टेशनवर बापू उतरला.

दे. भ. काळे आपल्या प्रेयसीला अडखळत अडखळत मोठ्यानें सांगत होतें—

' भिकारडा ! मी संघटना करतो ना त्या गिरणीमधला मजूर आहे. रुबाब बघा. सेकंड क्लासांत बसतो. दोन पैशाची प्यायची न् आठ आण्याची प्याल्याचा आव आणायचा. '

—आवाज कोठून येतो तें पाहाण्यासाठीं बापूनें आकाशाकडे बघितलें.

शरदृतूंतील मेघ जोराची गर्जना करीत होते.

चंद्रावरचा काळा डाग इतका ठळकपणें बापूला केव्हांच दिसला नव्हता.

—विष्णु गणेश भिडे.
( पुणें )



# १७

## पश्चात्ताप

'हं खबरदार बाबा असल्या अभद्र शब्दानें आईची छळवणूक कराल तर —'

' किशोरी, कुणाच्या समोर तूं उभी आहेस तें तुला समजतें ना ?'

' हो, समजतें. जन्मदात्या पित्यासमोर मी उभी आहे हें मला चांगलं समजतंय् '

' तोंड संभाळून बोल. घडघडीत आपल्या वडिलांचा अपमान करते आहेस—अपमान '

' बाबा, मी भीड मर्यादा सोडून बोलते याबद्दल मला क्षमा करा. पण बोलल्यावांचून गत्यंतर नाहीं म्हणून बोलते आहे. आपण सुशिक्षित आहांत. पण दारूचा अवलंब करून आपण आपल्या शिक्षणाचा दुरुपयोग करीत आहांत. आपल्याच संसारावर निखारे चढवीत आहांत. मुलीकडून आपला अपमान होतो. पण दारूला

मान अन् अपमान ह्यांचा संपर्क कधींच नसतो हें आपण अगदींच केसें विसरलांत ?'

*　　　*　　　*

बाबासाहेब निंबाळकर म्हणजे पुण्यांतील एक वजनदार आसामी होती. सरकारी नौकरी इमानें इतबारें केल्यामुळें आणि फुरसतीच्या वेळांत समाजकार्याकडे लक्ष दिल्यामुळें सरकारनें त्यांना रावबहादूर ही बहुमानाची पदवी देऊन त्यांच्या कार्याचा अन् सचोटीचा गौरव केला होता. अल्पसा खर्च, पुरेशी मिळकत आणि भरपूर मानमरातब यांमुळें त्यांच्या घरांत कसें रामराज्य चालत होतें. वडिलांची आर्थिक परिस्थिती अनुकूल असल्यामुळेंच किशोरीला–त्यांच्या एकुलत्या एक कन्येला वैद्यकीय उच्च शिक्षणासाठीं परदेशीं जातां आलें. सुभद्राबाई या जरी अशिक्षित होत्या तरी आपल्या एकमेव कन्येची शैक्षणीय प्रगति पाहून त्यांनाहि मोठी धन्यता वाटे आणि प्रसंगीं अभिमान पण दाखवीत.

कधीहि स्वतःपासून दूर न गेलेली किशोरी विलायतेला गेल्याबरोबर बाबासाहेबांना प्रथम कसें चुकल्याचुकल्या सारखें वाटूं लागलें. त्यांना वेळ घालविणें कठीण होऊन बसलें. कोठेंहि मन रमेना आणि कधीं काळीं कशांत मन गुंतेल असेंहि वाटेना ! घरांत पत्नि अशिक्षित असल्यानें सुशिक्षित बाबासाहेबांना घर ओकंओकं भासूं लागलें. आणि म्हणूनच करमणूकीखातर त्यांनीं 'जॉली क्लब' चें सभासदत्व

पत्करलें.

जॉली क्लबांत गेल्यापासून त्यांना आपल्या लाडक्या कन्येचा विरह सहन होऊं लागल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. कारण दुपारीं पांच वाजल्यानंतर ते जे क्लबांत जात ते रात्रीं दहा–अकरापर्यंत तेथेंच असत. मित्रमंडळीच्या गांठीभेटी, त्यांच्याशीं गप्पा आणि हरतऱ्हेचे खेळ यांत त्यांचे चारसहा तास कसे निघून जात हें त्याचें त्यांनाच उमगत नसे. सुभद्राबाईना सुद्धां हें पाहून समाधान लाभलें.

असा हा क्रम चारपांच महिने अव्याहत चालला. पण सुभद्राबाईच्या आणि किशोरीच्या दुर्दैवानें बाबासाहेबांना काय अवदसा आठवली कोणास ठाऊक ? त्यांनीं मित्रांच्या आग्रहास्तव दारूला सुरवात केली. आरंभीं आरंभीं संवयींचा अभाव असल्यानें ते फारच थोडी घेत. पण पुढें अंगवळणी पडल्यानें त्यांचें हें व्यसन मर्यादेबाहेर जाऊं लागलें. बिचाऱ्या सुभद्राबाई अगदीं जुन्या वळणाच्या, पतिला देव मानणाऱ्या ! मग त्यांचेकडून बाबासाहेबाला अडथळा तो कसा होणार ? बाबासाहेबांचें हे व्यसनी चाळे पुढें घरांत घुसले तरी त्या माऊलीनें ब्र देखील काढला नाहीं. इतक्यांत—

किशोरी आपला अभ्यासक्रम संपवून स्वदेशीं परत आली. आपले वडील आपणाला घेण्यासाठीं मुंबईला येतील अशी तिची बालंबाल खात्री होती. पण बाबासाहेबांनीं तिची केवढी निराशा केली ! घरीं

येतांच तिला वडिलांच्या न येण्याचें कारण समजलें. आपल्या वडिलांना दारूचें व्यसन जडलें आहे हें ऐकून तिला केवढा तरी धक्का बसला.

अर्थातच संधि मिळतांच तिनें प्रत्यक्ष वडिलांची हजेरी घेण्यास देखील मागेंपुढें पाहिलें नाहीं. वरील संवाद त्यावेळचा होता हें काय सांगावयास पाहिजे ?

* * *

आणि अशा रीतीनें किशोरी शक्य तितक्या शब्दांनें बाबासाहेबांची निर्भत्सना करीत होती. व्यसन जडल्यापासून तों त्यांची पराकाष्टा होईपर्यंत त्यांना कोणीहि अडथळा केला नव्हता; एवढेंच नव्हें तर शब्दानेंसुद्धां त्यांना कदापिहि दुखविलें नव्हतें. त्यामुळें किशोरीचे शब्द तापलेल्या रसाप्रमाणें कानांत गेल्यानें असह्य झाले. तिला तोंड देतां न आल्यानें ते तावातावानें आपल्या खोलींत निघून गेले. ह्यावेळीं त्यांना किशोरीच्या बोलण्याचा किती राग आला होता हें त्यांनीं आपल्या खोलीचें दार लावलें त्याच्या आवाजावरून सहज समजण्यासारखें होतें.

* * *

किशोरी आल्यापासून बाबासाहेबांना जॉली क्लबांत जाण्याची बंदी झाली. घरांतील सर्व बाटल्यांची कचऱ्याच्या पेटींत रवानगी झाली. आणि त्यांच्या प्रत्येक हालचालीवर किशोरीची सक्त नजर राहूं

लागली. व्यसन एकाएकीं बंद पडल्यानें बाबासाहेबांची स्थिति अगदीं वेड्यासारखीं झालीं होती. पण दोनतीन दिवसांतच त्यांची सुप्त झालेली विचारशक्ति जागृत झाली, हें चाणाक्ष किशोरीनें जाणलें. वडिलांना व्यसनापासून मुक्त करायला ही संधि बरी आहे असें ओळखून, तिनें आपल्या वाक्प्रहारानें त्यांच्यावर हल्ला चढविला. तिच्या शब्दानें बरेंच कार्य उरकलें अन् तिच्या दक्ष वागणुकीनें राहिलेलें काम केलें. आतां फक्त सद्सद्विवेकबुद्धिला चालना मिळावयाची कीं काम फत्तेच! पश्चात्ताप झाला कीं बावनकसी सोन्यासारखें पुनरपि बाबासाहेबांची व्यसनांतून सही सलामत सुटका व्हावयास वेळ लागणार नव्हता.

— आणि ही गोष्ट सुदैवानें नैसर्गिक रीत्याच घडून आली.

एकदां बाबासाहेब असेंच तळमळत पलंगावर पडले असतां त्यांचा सहज डोळा लागला आणि कांहीं वेळानें ते चांगले घोरूं पण लागले. निद्रावस्थेंतच त्यांना एक स्वप्न पडलें—

आपला अन् किशोरीचा संवाद चालला आहे. व्यसन सोडण्याबद्दल आणि घराची अब्रू राखण्याबाबत ती आपणाला पदोपदीं विनवीत आहे. प्रसंगीं आपली मर्यादा सोडून ती अधिकारवाणीनें बोलत आहे. तें सहन न झाल्यानें आपण तिच्यावर हात उगारला. किशोरीला राग येऊन ती ताबडतोब घर सोडून कोठेंतरी निघून जाते. पुढें बायकोहि या अवस्थेला कंटाळून जीवाचें बरेंवाईट

करून घेतें. एखाद्याची दृष्ट लागेल अशा सुरळीत प्रपंचाची दारूच्या पायीं राखरांगोळी उघड्या डोळ्यांनीं पहात आहे. मोठ्या अक्कल-हुशारीनें जतन केलेली अब्रूसुद्धां पार नष्ट झाली आहे. आणि बरोबरीचे मित्र ओळख देण्यासहि नाखूष आहेत. अशा कष्टतर परिस्थितींत रानोमाळ वणवण फिरत असतां किशोरीच्या शब्दांची राहून राहून आठवण येते. पण त्याचा त्यावेळीं उपयोग नव्हता. असेंच एकदां फिरत असतां आपणांस सर्पदंश होतो. किशोरीची अचानक भेट आणि तिचें गुणकारी औषध मिळालें नसतें तर—

या उपकाराची फेड बाबासाहेबांना दारू पिण्याची शपथ घेऊनच करावी लागली.

झोंप पुरी होऊन ते जेव्हां जागे झाले तेव्हां त्यांना किती तरी समाधान वाटत होते. हास्य त्यांच्या डोळ्यांत तरळत होतें. आणि किशोरीला भेटण्यासाठीं ते त्वरित खोलीबाहेर पडले.

× × ×

‘ किशोरी, किती तूं धाडसी आहेस ग ! आजपर्यंत मी इतका त्रास सहन केला, पण एका शब्दानें देखील मला बोलतां आलें नाहीं. ’

‘ आई, तूं इतके दिवस भेकडपणानं वागलीस म्हणूनच इतक्या थराला गोष्टी गेल्या. आतां बाबांच्याबद्दल मला सहानुभूति वाटत नाहीं असं कां तुला वाटतं ? पण—’

‘ त्यांनीं जर एकच गोष्ट सोडली तर –’ आणि एवढें म्हणून

सुभद्राबाईंनीं खालीं जमिनीकडे मान वळविली. तोंच—

इतक्या वेळपर्यंत दाराआड उभे असलेले बाबासाहेब एकदम पुढें आले आणि आपल्या पत्नीला आर्जवाचे शब्दांत म्हणाले—

'मी आत्तांच किशोरीपुढें शपथ वाहिली आहे. खरोखर मी आजपासून दारूला शिवणार नाहीं.'

* * *

पुणें नगरपालिकेनें दारूबंदीची चळवळ हातीं घेतल्यावर बाबासाहेब निंबाळकरासारख्याची अहर्निश मदत लाभल्यानें तिचें कार्य बरेचसें सुकर झालें.

—सौ. नलिनीबाई शिंदे.
(पुणें.)



समाप्त.




## मालेचें वैशिष्ट्य :—

- बहुजनसमाजास वाङ्मय वाचनाची गोडी लावणें.
- अप्रसिद्ध लेखकांचें मोलाचें लिखाण प्रकाशित करून त्यांस वाव व उत्तेजन देणें.
- ललितवाङ्मयाबरोबर भारदस्त वाङ्मय प्रकाशित करणें. किंबहुना भारदस्त व तात्त्विक वाङ्मयाचीच अधिक निर्मिति करणें.
- पुस्तक विकत घेण्याची आवड प्रत्येकांत उत्पन्न करण्याकरितां, पुस्तकाची किंमत शक्य तितकी अल्प ठेवणें.

## वर्गणीदारांसाठीं—

[ १ ] **आश्रयदाते**— एकदम अथवा दोन हप्त्यानें १०० रुपये एक वर्षांत देणारे.

[ २ ] **तहाहयात सभासद**— एकदम अथवा दोन हप्त्यानें ५० रुपये एक वर्षांत देणारे.

[ ३ ] **हितचिंतक**— एकदम दहा रुपये देणारे.

[ ४ ] **वर्गणीदार**– वार्षिक दोन रुपये देणारे.

वर्षांतून जास्तींत जास्त चार व कमींत कमी दोन पुस्तकें मालेतर्फे बाहेर पडतील. वर्ष जानेवारीपासून धरलें जाईल.

आश्रयदाते, तहाहयात सभासद व हितचिंतक यांना मालेचीं सर्व पुस्तकें मोफत पाठविलीं जातील.

वर्गणीदारास त्या त्या वर्षांतील पुस्तकें प्रकाशित होतांच मोफत मिळतील.

नम्र विनंति— मालेचा पवित्र उद्देश लक्षांत घेऊन सर्व बंधू-भगिनींनी तिला उदार आश्रय द्यावा.

मालेसंबंधीं सर्व प्रकारचा पत्रव्यवहार पुढील पत्त्यावर करावा—

**जयवन्त बाबुराव जगताप**, बी. ए. ( ऑनर्स )

१२४८ शुक्रवार पेठ, पुणें शहर.